# मोरोपंतकृत.

## भीष्मपर्व

# आर्या.

रा·रा· परशरामबल्लाळगोडबोले

यांच्यासहायानें

शुद्धकरून

माधवचंद्रोबा

यानी

लोककल्याणार्थ

प्रसिद्धकेल्या.




मुंबई.

माधवरावचंद्रोबा

यांच्या

शिलाछापखान्यांतछापिल्या.

शाके १७८२

सन १८६०

# मोरोपंतकृतभीष्मपर्वाच्याआर्या



हालाहलगळसा[1] प्रभु- उग्रतपा[2], परि अनुग्र[3];- हव्यास[4]

ज्यास परिहितीं[5] बहु, तो करि धृतराष्ट्रीं अनुग्रह व्यास. १

"युद्ध पाहावें ऐसें जरि तुज वाटत असेल, बा, पाहें.—

घे, दिव्य[6] दृशी देतों; मज किमपि कठिन नसेचि, बापा, हें." २

अंध[9] म्हणे, "दृष्टि नको; स्व-ज्ञाति-क्षय मला पहावेना.

रण-वृत्त[8] वरें[7] कळवा; हें आयकिल्याविना रहावेना." ३

व्यास म्हणे, "संजय तुज सांगेल, विचारशील समरा[10] ज्या,

तुजकरितां मजसीं हो पावोनि विचारशील समें, राजा. ४

"प्रथिता[11] करीन, वर्णुनि, कीर्ति तुझ्या, पांडुच्याहि, तनयांची.—

सनयांची[12] चिंता बुधे[13] न करिति जेसी, तसीच अनयांची[14]. ५

"पाहुनि उत्पातातें[15] बहु, तज्ज्ञ[16] सकंप काय होतात?"

हें ऐकुनि भूप वदे, "होणार चुकेल काय, हो, तात?" ६

भगवान् मुनिवर[18] गेला, पुत्राला सूचवूनि भाव्यर्था[17];

कीं न तयाची व्हावी, चिंता शोकें करूनि, भो[19] व्यर्था. ७

जाऊनि कुरु क्षेत्रीं, दुर्योधन नृपति-निकेंद[20] राहूनीं,

संजय नृपाकडे ये, भीष्म-निपतनांत[21] युद्ध पाहूनी. ८

---

१ शिवासारिखा, -२ उग्रतप ज्याचें, तपाविषयीं उग्र, -३ थंडस्वभावाचा, -४ व्यासंग, उत्साह, -५ गुह्यभावांत, -६ ज्ञानदृष्टि, -७ वरदानेंकरून; पाठांतरी 'वरें' असाहि शब्द आहे, -८ युद्धाविषयीं, -९ दिव्यज्ञानस्वभाव, -१० सारखा, -११ प्रसिद्ध; विस्तृत, -१२ स-नय-न्याययुक्तांची, -१३ ज्ञानी, १४ अपराध्यांची, -१५ शुभाशुभदर्शकचिन्हें, -१६ ज्ञाते, -१७ होणाऱ्या अर्थास, १८ मुनिश्रेष्ठ, १९ शोभा, तेज, २० जपळ, २१ भीष्म पडेतोंपर्यंत.

धृतराष्ट्रासि म्हणे,"जी, संजय मी,-वंदितों तुम्हां; परिसा.-
अद्भुत झालें,-वधिला स्वतात शिखंडिनें,-गर्जे हरिसा!"[१]
नृपति म्हणे,"अनृत कसें झालें स्वाधीन मृत्यु होता तें!
फिरलें अदृष्ट, अथवा त्यजिलें कोदंड काय हो तातें? १०
"शिवली शिखंडि-शस्त्रें कैसीं? गुरु देव विप्र मत्तातीं
नित्य प्रसन्न कीं हो!-स्पर्शाचीं स्पष्ट विभ्रमत्ता तीं. ११
"रामासहि न मिळालें हें यश, भुवनांत जो असा मान्य!
हा पांचाळ शिखंडी-आहे द्रुपदासि कृत असामान्य! १२
"बा! तुं महानिरंकुश![४]-लिहिलें ऐसें कसें, अगा, धात्या?
हा गोष्पदीं[६] बुडावा, लंघुनि रामार्णवा-अगाधा-त्या? १३
"हा! भृगुपति-वर-विद्या- सर्वस्व-निधान-धन! पाहा, तात!
अनुभविलें क्षण-भंगुर सर्वहि, जें कृज्ञजन पहातात १४
"पितृ-शोक-वज्र-पातें हि न द्के कां सांग, गा, पतन याचें?
होय अकस्मात् तारक[१०]- तात-क्षय-हेतु पाप तनयाचें! १५
"मशिला कसा उतरिता रिपुचा-काकुत्स्थवीरसा[११]-रेंच?
कैसें उरेल विधिनें रचिलें हें हृदय हीरसारेंच[१२]? १६
"त्वद्दोषेंचि बुडाला देवव्रत हा-महातपा[१३]-पोरा!
दुर्योधना! भिजवितें अश्रु, कृजवितात हात, पापोरा[१४]! १७

---

१ असत्य,-२ दैव,-३ धनुष्य,-४ ज्यास शासनकर्ता नाहीं तो,-५ हे ब्रह्मदेवा, ६ गाईचे खुर उमटलेल्या जाग्यांतील पाण्यांत,-७ परशुरामरूप समुद्र,-८ खोल,-९ परशुरामाच्या श्रेष्ठ विद्येच्या सर्वस्वाच्या कोशांतील धना,-१० तारायास समर्थ अशा ताताच्या क्षयास हेतुभूत,-११ रामासारिखा,-१२ हिऱ्याच्या सारानें, दृढत्वानें,-१३ महान् आहे तप ज्याचें,-१४ पाप-उरास, पाप्याच्या उरास.

"करितां न धर्म-लंघन, तरि तुमचा भीष्म-सेतु उरता, तें
कांय वदावें आतां? ध्यावें बडवुनि ललाट, उर, तातें! १८
"दुःशासना खला! त्वां साध्वीची सोडिली निरी हातें,
त्या कर्माचें फळ हें झालें ऐशाहि या निरीहातें! १९
"प्रभुता असोनि शासन केलें न तुज प्रकाम-मत्तातें,
हेंचि पतन कारण; जंव इतर लवहि जोडिलें न मत्तातें! २०
"रे,-सौबळ, दुर्योधन, दुःशासन, अंगदेश, हा! खल हो!
चूर्ण करील तुम्हाला धर्म बता, भंगदेश हा खल हो! २१
"झाला कृत-कृत्य जगीं, जाइल भेदूनि तात हा रविला;
मारविला धर्में कुळ- गुरु राज्यार्थ, स्वधर्म हारविला! २२
"हा धर्मा! स्वल्पार्थें कां वधिला ओपिता महालाभा?
स्वप्नांत म्हणत होतीं दिक्पांची-'ओ'-पितामहाला भा! २३
"रे, धर्मा! व्यर्थ तुझें झालें सद्धार्मिकत्व! औं ज्याला
कवळार्थ पसरिला, त्या वधिलें कैसें धनार्थ आज्याला? २४
"झालें काय, कराया ज्या तेजें विश्वहोम शकता, तें?
नगणावा गरुडहि, मग लेखावा काय, हो, मशक तातें? २५
"बा, संजया! सविस्तर वद, खचला केविं तो पिता तरणी?
आहे कीं द्रोण, यदिषु लाज रविकरांसि ओपितात रणीं? २६

---

१ कपाळ,-२ निर्-ईहा-निरिच्छास,-३ अतिउन्मत्तास,-४ कर्ण,-५ खलाचा बत्ता,-६ भंग-देश, रणांगण,-७ देता,-८ दिक्पाळांची,-९ भीष्मास,-१० प्रभा, तेज,-११ मुखपसरणें,-१२ सूर्य,-१३ यत्-इषु-ज्याचे बाण. १४ सूर्याच्या किरणांस.

"जो देव म्हणत होता, अनुदिन, 'सत्हदंबुजव्रजा, विकसे'.
त्या अद्भुत भीष्म-दिवा- कर-पतनीं वाटलें तुम्हासि कसें?" २७
संजय म्हणे, "नरेशा! तेव्हां ऐसेंचि वाटलें कांहीं
कीं, भीष्में धरिली ती वरिलीच तुझ्याहि वाट लेकांहीं. २८
"अनयें तुमच्याचि पिता- साधु-शमविला, न याविना शमला.
लोभी म्हणतो, 'झाला न त्यजितांही नया, विनाश मला.' २९
"लोभी धर्मनय-नयन- हीन म्हणे, 'हा!'-तसा न अनयन-'हा!'-
करितां अजातरिपुचा विद्वेष, कसा अधर्म, अनय, न हा? ३०
"करितां साधूच्छेद, स्वोच्छेदचि होय, हो; यश न राहे.-
खल काम, कोप, लोभ, छळिति बळें, करूनियां वश नरा, हे. ३१
"युद्ध सविस्तर कथितों, ज्ञान मला जें दिलें गुरुवरानें
श्रीमुनिनें तुजकरितां, तें हें काय न तुवां कुरुवरानें? ३२
"कुरु गुरु, भीष्म, द्रोण,- प्रातःकाळीं उठोनि, देवास
प्रार्थुनि, वदले, 'धर्मा जय, आम्हा निज पदींच दे वास.' ३३
"त्वत्तनयें भीष्म पुढें केला, बल सिद्ध करूनियां कल्हा.
धर्में, धनंजय मतें, भीम-महा-बाहु कीं, महा-कल हा. ३४
"स्वल्प स्व-बल, सुयोधन- बल विपुळ, म्हणोनि धर्म जो भ्याला,
त्यासि म्हणे विजय, 'विजय- लव लाभ नसे परस्व लोभ्याला.' ३५
"वा, सत्य धर्म जिकडे, तिकडे श्रीकृष्णनाथ जाणावा.

१ आश्चर्यकारक, - २ सूर्य, - ३ न्याय, नीति, - ४ अंध, - ५ साधु-उच्छेद, ६ महावीर्य, - ७ अर्जुन, - ८ पर-स्व- लोभी-दुसऱ्याचें द्रव्य इच्छिणा त्यास, - ९ मसहीं, - ※ सत्हत्-अंबुज-व्रज- बंधुवर्गकमलसमुदाय, - * प्रफुल्लितहो.

ह्या तेथें जय, रविसा- पार्थुनि नलगे प्रकाश आणावा. ३६

"जिकडे हरि,-हर[1], विधि[2], मुनि- वर, वेद, दिगीश[3], शक्र[4] हे तिकडे

फोडील मेरुचेंही, एतद्दृक्प्रहितचक्रहेति[5], कडे. ३७

"वर्णूं कैसे कौरव- पांडव-सेना-समूह[6]-अर्णव[7] ते?

गुरुवर मला कथंचित् करिता जरि दशशतास्य[9], वर्णवते[8] ३८

"येतां धर्म यशाच्या, अकरा अक्षौहिणी चमूं[10], हरणा,

झाला सिद्ध युधिष्ठिर- भीम-नरी[11]-त्रप्त भट[12]-समूह रणा. ३९

"तर्कित होते निज, पर भट- विधु[13], कीं रवि, असें-पहाते ज्या,

त्वन्नंदन-सेनाग्रीं होता त्वत्तात तो-महातेजा[14]. ४०

"केल्या कपि[15] ध्वजानें तुमच्या सकळाहि विप्रभो[16] सेना.

तदधिक[17] न पर[18], वसिष्ठा- धिक कोण्ही जेवि विप्र भासेना. ४१

"युद्धारंभीं यदुपति वदला, 'विजया, रथातळीं उतर.

दुर्गेसि हात जोडीं; होइल खल-बल[19]-समुद्र हा सुतर[20]. ४२

'त्रिभुवन इच्या प्रसादें- जेविं वसंतर्तुनें[21] समस्त वन-

शोभे; म्हणुनि करावें त्वां, केवळ दुर्बळा-सम, स्तवन.' ४३

"स्व-रथाखालीं उतरुनि, नमुनि म्हणे विजय[22], 'विजयदे, दुर्गे,

---

१ शिव, -२ ब्रम्हदेव, -३ दिक्-ईश- दिक्पाळ, -४ इंद्र, -५ एतत्- दृक्-प्रहित-चक्र-हेति, ऐशा कृष्णाच्या दृष्टींतून निघालेलें चक्रशस्त्र, -६ समुदाय, -७ समुद्र, -८ कसेंतरी, -९ सहस्त्र मुख शेष, -१० सैन्य, -११ भीम- नर- आत्रप्त- भीमानें आणि अर्जुनानें आत्राहिल्हेला ऐसा, -१२ योध्यांचा समुदाय, -१३ चंद्र, -१४ महान् तेज ज्याचें ऐसा, -१५ कपि आहे ध्वजीं ज्याच्या अशा अर्जुनानें, -१६ निस्तेज, -१७ तत्-अधिक- त्यापेक्षां अधिक, १८ श्रेष्ठ किंवा शत्रु, १९ दुष्ट सैन्य समुद्र, -२० तरायास सोपा, -२१ वसंत ऋतूनें, -२२ अर्जुन.

त्वत्पद भजनीं बहु सुख, म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला, 'दुर्गे'. ४४
'आम्हां दासां रक्षी, भगवति जगदंबिके! अनादि सती!
येती शरण तुला जे, केउँले वाणे न ते जना दिसती. ४५
'वासरमणि-कोटि-रुचे! हास रस वशीकृत स्मराराते!
कासरनगाशने! हा दास रणीं विजय-पात्र हो, माते!' ४६
"ऐसें स्तवितांचि, शिवा दर्शन देउनि म्हणे,'अगा, साधो!
त्वदुदारता जसी, तसि न सुरांच्या बहुमता अगा साधो. ४७
'घ्याया मज यश, लोकां सुख, गृध्रां तो लुलाय मांस-भरें.
मरतिल तसेचि तव रिपु, मानुनि समरीं तुला यमासम, रे. ४८
'विजयी-महेश्वरासम-तूं, नारायण सखा नरा! हो, रे.
वदलों काळाला कीं, खल-बल निःशेष खा; न राहो, रे. ४९
"देउनि विजय-वर असा, झाली अंतर्हिता भवानी ती.—
सदवन, असदवन,—या नित्य जिच्या बहुमता भवा नीती. ५०
"स्वरथीं चढला, पावुनि वर, ईश्वर-दत्त-हस्त, वासवि; त्या
पाहुनि म्हणति मुनि मनें, 'यासि अव्हेरूनि न स्तवा सवित्या!' ५१

---

१ अगं, दूर;-२ दीनवाणे,-३ हे कोटिसूर्यप्रभे,-४ हास-रस-वशीकृत-स्मर-अराति-हास्य रसानें वश केला आहे मदन शत्रु शिव जीणें ऐशे,-५ कासर-नग-अशनि-महिषरूपपर्वताविषयीं वज्ररूपे,-६ भवानी,-७ दृसास, कल्पनरूस,-८ महिष,-९ गुप्त,-१० चांगल्याचें रक्षण,-११ दुष्टांचा नाश, -१२ शिवास.

* याचा- 'कासरनगासने'— असा एक पाठ आहे आणि त्याचा अर्थ असा होतो कीं—महिषरूपपर्वत न आहे आसन जीचें.— परंतु हें युक्त दिसत नाहीं. महिषासुर दुर्गेनें मथन केला आहे. महिष कांहीं तिचें आसन नाहीं. यापेक्षां या ग्रंथांत जें पद घेतलें आहे तें येथें अर्थगौरवानें फार युक्त आहेसें दिसतें. 'कासरनगाशने'- महिषरूप पर्वताविषयीं वज्ररूपे,- कारण- महिषासुरमथनी;—

"युद्धारंभीं, भीष्म- द्रोण-प्रमुखा[1]ऽखिलाप्त-वध-भीता
शक्र-सुता[2] त्रिजगद्गुरु- कृष्णें उपदेशिली स्वयें गीता. ५२
"गत[3]मोह-तमो[4]हरसा- सजला हृत[5] गोप मुग्ध सारथी जो,
तत्तेजें न गळे पर- बल तरि, अनलें[6] हि दुग्ध-सार[7] थिजो! ५३
"बहुविध[8]-वाद्य-रव, अमर- नाथादि विमान दाटले खांत[9];
वर्णीति नर-नारायण. कोण तयांचे न भाट लेखांत[10]? ५४
"इतक्यांत; धनु, कवच, रथ, कवणासहि न पुसतांचि, सोडूनी,
धर्म निघे कुरु-सेना-[11]ग्रग-भीष्माभिमुख, हात जोडूनी. ५५
"त्यजुनि रथातें मारुति धांवे, तेंसाचि जिष्णु-सह देव.
टाकूनि उडी, धांवत गेले मागूनि नकुळ, सहदेव. ५६
"ते धर्मातें म्हणती, 'करुनि श्रीशंकरा नवस, राजा!
चिंतित होतों चित्तीं तेरा वर्षें सदा अवसरा[12] ज्या, ५७
"तो हा प्राप्त बहु दिसां झाला जों, तोंचि काय हें सुचलें?
कार्मुक[13] टाकुनि, जावें खल-कटका-प्रति असें कसें रुचलें? ५८
"धर्म म्हणे; 'पांडव, हो, अद्भुत नाहींच युद्ध-सम यज्ञ

---

१ भीष्म-द्रोण-प्रमुख-अखिल-आप्त-वध-भीत-भीष्मद्रोणादि सर्व आप्तवर्गाच्या वधास भीणारा असा, -२ शक्र-सुत अर्जुनास, -३ अर्जुनपक्षीं,-गेलें आहे अविद्यारूप पडळ ज्यापासून. चंद्रपक्षीं-गेलें आहे अंधकार पडळ ज्यापासून, -४ तमस्-हर-अंधकार हरण करणारा चंद्रासारिखा, -५ हृत-गोप-मुग्ध-सारथि-हरण केल्या गोपस्त्रिया जेणें असा कृष्ण आहे सारथी ज्याचा तो अर्जुन, -६ अग्नीनें, -७ घृत, -८ बहुविध-वाद्य-रव अनेक प्रकारच्या वाद्यांचा नाद, -९ आकाशांत, -१० देवांत, -११ कुरु-सेना-अग्र-ग-भीष्म-अभिमुख-कुरुसेनेच्या अग्रभागीं गमन करणाऱ्या भीष्मासमोर, -१२ वेळास, -१३ धनुष्य, -

म्हणउनि बहुधा जातो. हा गुरुनमनार्थ-शब्द समयज्ञ[1].' ५९

"भीम, श्वेताश्व[2], नकुल, सहदेव, श्रीमुकुंद, हे मागें
चालति; पुढें युधिष्ठिर,-जोडावे ज्यासि हात हेमागें[3]. ६०

"जें संपादी, होउनि मत्त, बळें,-नीच, मूढ वाळी[4]-तें
कर्म जयाचें, त्याची करिती झाली चमू दवाळीतें[5]. ६१

'अभयार्थ शरण येतां? सोडुनि भू-लाभ-यत्न, सानुज, या.-
पुष्कळ वाटेना कां, विंध्य नव्हे पात्र रत्नसानु[6]-जया. ६२

'अजि धर्मराज! ठावें पांडित्य तुम्हासि लवहि न भटांचें[7].
यांचें हृदय पाहातां, विपुल म्हणति कवि, तथापि नभ ठेंचें[8]. ६३

'सार्जुन भीमाहि अयशीं, सेवुनियां दुर्गुणासचि, बुडाला.-
न भजति सुयशस्काम[9] क्लीबा[10], आरोग्यकाम[11] चिबुडाला. ६४

'धन्य सुयोधन लोकीं; अन्य नसे यासमान राजन्य!-
वन्यगुणें[12] काय घडे मारुतिसीं इतर वानरा जन्यें[13]?' ६५

"प्राकृत कौरव-सैनिक करिती उपहास बहु असा, राजा.
त्या वर्णूं काय, रसिक बहु विटती सेवितां असौरा ज्या? ६६

"भीष्माचे पाय धरुनि, धर्म म्हणे,'हो पितामह! स्वैरतें[14]

---

१ समयजाणणारा,-२ श्वेत-अश्व-शुभ्र आहेत हय ज्याचे असा अर्जुन,-३ हेम-अग-सुवर्णपर्वतें, मेरूनें,-४ वानर विशेष, सुग्रीवबंधु,-५ उपहास,-६ मेरू पर्वत जिंकावयास,-७ योध्यांचें,-८ लहान,-९ सुयशस्-काम-उत्तम कीर्ति इच्छिणारे,-१० नपूंसकास,-११ आरोग्य इच्छिणारे,-१२ वनांतराह नात्याागुणें,-१३ युद्ध, १४ स्वराकरतें,-+ सेना,-※ अहोबंधू,-‡ अर्जुनसहित,-॥ रुचिरस्न्यास.

मन समरमखारंभा.–हेंचि करावें हिना महत्त्वरत्नें. ६७
'द्या आज्ञा; सानुज मी पौत्र तुम्हासीं करीन शत्रु रण.–
गुर्वनुमतें स्वधर्मा- चरणें कवि करिति कुल-समुद्धरण. ६८
'आशीर्वाद मजकडे द्या; देइल भव्य-कोटि,–केशव,सा.–
गुर्वाशीर्बलवर्जित जो, क्षणहि उभा न तो टिके, शवसा. ६९
"भीष्म म्हणे, 'झालों मी या कर्में-करुनि सुप्रसन्नमना.
देतों शाप पराभव व्हाया, येतासि जरि न मन्नमना. ७०
'भंगेल गुर्वपूजक, साधुनि देईल गर्ग हारा ज्या;
या कर्में तूं साक्षात् सकलाहितकामभर्ग हो, राजा. ७१
'बा! पुरुष अर्थ-दास; न अर्थ पुरुष-दास; जाणत्या! समज
कीं, बद्ध कौरवांनीं केलें अर्थेंचि जाणत्यास मज! ७२
'युद्धेतर वर मागें. द्यावें म्यां काय, सज्जना! तूतें?
जें आज्याचें, घ्याया योग्यचि तद्भजनसज्ज नातू तें.' ७३
"धर्म म्हणे, 'आजोबा! उत्साहें कौरवार्थ भांडावें.
साह्य करावें माझें–हा द्या वर,–मज मनें न सांडावें.' ७४
"शांतनव म्हणे, 'वत्सा! काय करूं? सांग वत्स-वरदा या.–
बापा अजातशत्रो! माझ्या तूं मात्र पात्र वर-दाया.' ७५
"धर्म म्हणे, 'अपराजित आपण झालांचि-रामें-सम, रामीं.–

१ समर-मख-आरंभ- युद्धयज्ञाचा प्रारंभ करावयास,-२ महत्त्वदक्षिणाऱ्यानें,-३ उद्धार,-४ कल्याण,-५ गुरु-आशिस्-बल-वर्जित,-६ प्रेतासारिखा,-७ मत्-नमन+माझ्या नमनास,-८ गुरु-अपूजक, गुरूस न पूजणारा,-९ सकल-अहित-काम-भर्ग-सर्व शत्रुरूप मदनाविषयीं शिव,-१० युद्ध-इतर-युद्धावेगळें,-११ तत्-भजन-सज्ज-त्याचे भजनीं तत्पर,-१२ भीष्म,-१३ वरदेणाऱ्यास १४ वररूप दानाच्या दयेस,-१५ रामचंद्रासारिखा.

करिन म्हणतों, कराया तुमचा तेजो-विराम, समरा मी. ७६

'होइल कसा स्व-परिभव सांगा; साहित्य होय हें मोजें.—
उत्कर्ष-करचि शस्त्र- ज्वलनपतन वीरदेहहेमा जें.' ७७

"भीष्म म्हणे,'मज लोकीं जिंकीसा वीर आढळेना, गा.—
हरहि सिंह महामद- मत्ताही काय, गा, दळे नागा? ७८

'न टिकेल शक्रहि, धरुनि चित्तीं यला,-करांत शतकोटी!
बुडतिल बाहु-बल-मदें भट या रत्नाकरांत शत-कोटी!' ७९

"धर्म म्हणे,'म्हणुनचि मज जोडुनि द्यावा तुम्ही उपाय सवा.—
सबुभुक्षितेंही सपितर म्हणति क्षुधिता मुला-क्षपायस खा.' ८०

"भीष्म म्हणे,'बा, बहु-मत साधुचि, न तसें सदा असें ज्ञात्या.
जा, ये पुन्हा.-प्रतिज्ञा न जडा सुज्ञा, जडा-असुज्ञा त्या. ८१

"द्रोणहि असेंचि नमितां होउनि परम प्रसन्न—'एद लाहो
पुण्यश्लोक युधिष्ठिर!'- इत्याद्याशी-सहस्र वदला, हो. ८२

'धर्मा! भला, भला, गा! शाप चुकविला, सुधर्म-समयज्ञा!
करिशील खळ-क्षत्रिय- पशु मारुनि परशुराम-सम यज्ञा! ८३

'जो तुज रुचेल तो मज- युद्धाहुनि इतर-सर्व वर माग.
लाजोत अभीष्ट[12]-प्रद जे मंदारादि[13] पांच परमागे!' ८४

"धर्म म्हणे—नमुनि,'तुम्हा पुसतों तुमचाचि मी वधोपाय[14].—
द्यावा,-कुठार कल्प-द्रुमसा—हा वर, मला वंद्य[15] पाय. ८५

---

१ माझें,-२ महत्त्वकरणारा,-३ शस्त्र-ज्वलन-पतन-शस्त्ररूपअग्नींतपडणें,-४ वीर-देह-हेम-वीराचा देहरूप सुवर्णास,-५ हस्तीस,-६ इंद्र,-७ वज्र,-८ समुद्रांत,-९ अति क्षुधित,-१० बहुमान्य,-११ प्राण,-१२ इच्छितदेणारे,-१३ मंदारादिस्वर्गांतील पांच-परम-अग-उत्कृष्टवृक्ष,-१४ वध-उपाय,-१५ मान्यहोवो

"द्रोण म्हणे,'होइल जरि साधु सुखें सुमहदप्रिय-श्रवण,
योगबळें देहातें त्यजिन, करुनि चित्त-उपशम, प्रवण. ८६
'तेव्हां करील कोण्ही भलता त्वद्वीर मन्मथन, राजा.-
सुगुरु सुशिष्य-सुवश कीं, सुस्त्री वश सुबहु-मन्मथ-नरा ज्या.' ८७
"यापरि, इतरांसुलभ स्व-गुरु द्रोण-प्रसाद साधुनि घे.-
ऐसेंचि कृपाचार्या प्रतिही वंदावयासि साधु निघे. ८८
"नमनें प्रसन्न होउनि, कृपहि म्हणे,'या विधीस चुकतास,
तरि देतों शाप तुला; विजय न घडता, हितास मुकतास. ८९
'अर्थाचा दास पुरुष, अर्थ नव्हे पुरुष-दास-बापा, हें
सत्य.- मज कौरवांनीं केलें अर्थेंचि बद्ध बा, पाहें. ९०
'यास्तव मी-क्लीबा परि- वदतों युद्धान्य सर्व वर मागें.
राया! त्वत्सम साधु, ज्ञाता, झाला न भूमि-वर मागें!' ९१
"स्ववधोपाय वदा-हा वर द्या-न वदों शके असें नृपती.-
परि, कामेंना मनींची गूढाही समजला सुधी कृप ती. ९२
"बोले,'जरि संकोचें न मनोरथ कळविसी, परि समजला.-
गुरुवत्सला! असे तव- हित-चिंता बहु तुझ्या-परिस मजला. ९३
'असतें मरण कृपाळीं, कथितों तदुपाय; फार यश होतें.
परि नाहीं, काय करूं? त्यां दो युद्धांसि मात्र वश, हो, तें. ९४
चिंतीन त्वद्विजय, ब्राह्म-मुहूर्तीं उठोनि, संतत मी.

---

१ सुमहत्-अप्रिय-श्रवण-अत्यंत अप्रियाचें श्रवण, -२ शांति, -३ तत्पर, -४ त्वत्-वीर-तुझा वीर, -५ मत्-मथन-माझें मथन, -६ मदना सारिख्या पुरुषास, -७ दुसऱ्यांस असुलभ, -८ कृपेस, -९ पूर्वी, -१० इच्छा, -११ गुप्त, -१२ सु-धी-उत्कृष्टबुद्धिज्याची, -१३ तत्-विजय.

जे, जे, गुरुभक्ति-रसिक, ते न भ्रमले पडोनि संत तमीं! ९५
"एवं, नृप कृप-गुरु-वर साधुनि, शल्यासिही करी नमन.
तोहि म्हणे, 'मांग वर.-प्रिय करुनि, तुझें सुखी करीन मन.' ९६
"धर्म म्हणे, 'उद्योगीं जो दिधला तोचि, मद्र-महि-वर, हो,
सूतात्मज-तेजोवध-वर बहु; तेणेंचि भद्र महिवर हो.' ९७
"शल्य म्हणे, 'बा, धर्मा! हें तों आम्हास काम सामान्य.
जा; हो, खल बल मर्दुनि, विजयें विश्वांत, रामसा, मान्य.' ९८
"ऐसे भीष्म-द्रोण-प्रमुख-गुरु-वर-प्रसाद साधूनी,
परते धर्म महात्मा.-स्तविला बहु नारदादि साधूनीं. ९९
"ब्रह्म्याचेंही करिती ज्याच्या बोधामृतासि आ कर्ण,
तो भगवान् कर्णातें भेटोनि म्हणे, 'मदुक्त आकर्ण[10]. १००
'धर्मा सहाय हो, ये.-धरिति परार्थहि असि-प्रति ज्ञाते.-
पार्थी-भीष्मामार्गें युद्ध करावें-असि[11] प्रतिज्ञा ते. १
'भीष्म पतनपावे तों आम्हाला हो सहाय, चाल कसा.-
सुभट पार्थाचा पर-दमनीं-गमनीं तुरंग चालके[13]सा.' २
"कर्ण म्हणे, 'विप्रिय तिल-मात्र घडो या सुयोधनाचें न.
कृष्णा, दारोदारीं-नटसा-कां मी सुयोध[14] नाचेन? ३
'त्यजिलें सुयोधनार्थ स्त्री-प्राण-धनासह स्व-धाम[15]हि म्यां:-

---

१ अंधकारांत,-२ अहो मद्रदेशपति शल्य,-३ कर्ण,-४ कल्याण,-५ पृथ्वीवर,-६ होवो,-७ परशुरामासारिखा,-८ कमलादि मुखांना 'कर्ता' जसें मुख आकारितात तसें-शब्द ऐकतां कर्ण आकारितात, परंतु हें लाक्षणिक रीत्या,-९ मत्-उक्त-माझें बोलणें,-१० ऐक,-११ खड्गास,-१२ चालणारा,-१३ अहित,-१४ उत्तम योद्धा,-१५ गृह.

या कर्मांच्या पावे, न स्वाहा, तसिच न स्वधा कींहि ग्या. ५
"कर्ण न मिळतां पेरते, ज्याच्या नामें तरे अजामिळ, तो.-
साधुमुखें-'साधु'म्हणुनि- घेणारा तोंचि या अजो मिळतो.
"त्यां दोंकटकांत उभा धर्मात्मा धर्मराज राहोनी,
उजवा बाहु उभारुनि, उच्च वदे, कौरवांसि पाहोनी. ६
'न वरा असाधु नृप. कां पडतां, राहुनि तयासमीप, दैरीं?
खल-संग त्यागुनि जो येइल, घेइन तयास मी पदरीं.' ७
"भेटे युयुत्सु धर्मा, त्यजुनि ज्येष्ठा, कृतांनया भ्रात्या:-
जेसा साधु बिभीषण रघु-कुल-तिलका महा दयाभ्रा त्या. ८
"धर्म म्हणे, 'बा! तूं तो बंधु, करूं नेणसीच अन्याया;
परि म्हणतों या समयीं येतां आगस्करांहि अन्यां,'या: ९
'उरसील तूंचि, साधो! इतर सकळ दुष्ट भस्म होतील.
हस्त तुझाचि तिलोदक त्या ताताच्या मुखांत ओतील.' ११०
"वेश्यात्मजागमन हें,- जेविं अवसरात्तयुक्त तोकें वच,-
स्वीकारूनि, गुणज्ञ प्रभु घे, स्वरथीं चढोनि, तो कवच. ११
"ज्याला न्याय म्हणे-'हूं,' कारुण्य म्हणे-'धरू नको दंड,'-
तो श्रीमदजातारी स्वरथीं बसतां धरून कोदंड. १२
"चढले रथीं भुजांतें भ्राते भीमादि सर्व थापटुनी;

---

१वेदमणीतविधिविशेष,-२फिरे,-३जन्मरहिता,-४रचन्यांत; भीतीनं;-५कृत-अनय-केलाआहेअन्यायज्याणें,-६दया-अभ्र-दयारूपमेघास,-७अपराध्यांस,-८वेश्या-आत्मज-आगमन-युयुत्सूचें येणें,-९अवसर-आप्त-युक्तप्राप्तवेळासयुक्तअसें,-१०बाळकांचेंवचन,-११श्रीमत्-अजात-अरि-धर्मराज,-*धृतराष्ट्राच्यावेश्येचापुत्र.-

धरिलाचि रणोत्साह, त्यजुनि मरण-भीति सर्वथा, पटुनीं. १३
'पाहुन अजातरिपुची तादृक् गुरु-चरण-भक्ति, महिवरले
अर्हवंत लेखवरांहुनि बहु कठिनाहि यवन-वीर गहिवरले!' १४



## अध्याय २

### प्रथमदिनयुद्ध.

"भीष्म पुढें करुनि, उठे प्रथम सुयोधन करावया कदन;
भीम पुढें करुनि, उठे धर्म प्रभु-जो सुकीर्तिचें सदन. १
"लीलेनें हिडिंबांचा न मद अवस्थापिला महान, रणीं,—
न दिसो देचि जनां तव लेश अवस्था पिता-महांतरणी. २
"भीमाचा सिंह-ध्वनि करि बल-धैर्या अपाय, देवा, जी.—
लक्षांत एकहि पुढें, यत्न शतेंही, न पाय दे वाजी. ३
"भीमाच्या सिंह-रवें हगले, मुतले, समस्त गज, वाजी.—
ह्मणति, 'न असमंदसूंहीं याकरवीं अंतकासि यजवे, जी.' ४
"भीमाचा सिंह-ध्वनि कोणासहि आयकों न दे वाद्यें.—
सोडुनि समाधि, मस्तक डोलविलें, आयकोन, देवाद्यें! ५
"शल्य-युधिष्ठिर-भीष्मा- र्जुन-भीम-सुयोधनादि हे तुमुलें
युद्धें करिते झाले.— स्व-पर-विनाशीं तुसींच हेतु मुलें! ६

---

१ रण-उत्साह,-२ श्रेष्ठांनीं,-३ नेसी,-४ सर्वश्रेष्ठ;-५ देवश्रेष्ठ,-६ युद्ध,-७ हिडिंब जे शत्रु तेच इभ गज त्यांचा,-८ महासूर्य,-९ घोडा,-१० अस्मत्-अस्म-आमच्या प्राणांहीं,-११ यमास,-१२ आराधना-यज्ञ करवा,-१३ देव-आद्य- महादेव,-९ ठेवणारा

"सहदेव दुर्मुखासीं, गुरु-पुत्रासीं करी रण शिखंडी;
राक्षस–अलंबुष, घटो- त्कच-भिडले बहु-जसे अहि[1] शिखंडी[2].७

"दुःशासन नकुळासीं, धृष्टद्युम्नासवें भिडे द्रोण;
सात्यकिसीं कृतवर्मा; द्वंद्वें वर्णील तीं किती, कोण? ८

"युद्धें जिकडे तिकडे.–शोणित- गंधें समस्त भट भुलले
स्वपरक्षतजोक्षित[3] ते–जेंवि वसंतीं पलाश-तरु फुलले! ९

"येउनि वराप्सरा[4] अव- लोकी राजन्य-संगरा ज्या जी
ती तदितर वांछीना–जेंवि सती अन्य-संग, राज्याजी[5]! १०

"वर्णित होत्या आधीं वीरांच्या शक्र सुर-वधू[6] लीला;–
निंदाव्या, परि निंदित नव्हत्या त्या रुद्ध-स्वर्ग-धूलीला[7]. ११

"बहु साधुहि साधूंतें वधिते झाले–जसे खळ खळांतें.
जें तद्रक्त वहातचि होतें–वर्षांबुसें[8]–खळखळां तें! १२

"मांडोनि भागला बहु भगवान् भार्गवहि करुनि पण ज्यासीं,
संगर करिता झाला अभिमन्युकुमार त्या स्वपणज्यासीं.१३

"भीष्मशर-हत-विराट- क्षितिप-सुत[9]-श्वेत, करुनि समर, मरे.
वदले सुरर्षि[10] त्यातें, 'बा चिरे[11] नाकीं[12] महेंद्र सम रम, रे! १४

"सिंहें गजसा–भीष्में वधितांचि श्वेत–धर्म-सेनानी[13],–
निज शिबिराच्या[14] आश्रय केला बहु-भीत-भग्न-सेनांनीं. १५

---

१सर्प,-२ मयूर,- ३ स्व-पर-क्षतज-उक्षित–आपल्या आणि शत्रूच्या क्षतापासून उत्पन्न झालें जें रक्त तेणेंकरून भिजलेले,–४ अप्सराश्रेष्ठ, ५ राज्याच्या गुरुराज,–६ देवांगना,–७ रुद्ध-स्व-रथ-धूलि-रोधिला आहे उत्तम धर्म ज्या धूलीनें तीला,–८ वर्ष-अंबु-वृष्टीचें कासारखें,–९ भीष्माच्या शरें ताडित असा विराट भूपाचा सुत श्वेत नामा,–१० सुर-ऋषि-देवऋषि,–११ चिरकाल,–१२ स्वर्गी,–१३ सेनापति,–१४ सैन्याची तळभूमी.–

## अध्याय ३

### द्वितीयदिनयुद्ध

“परिभव-खिन्न युधिष्ठिर रात्रौ प्रभुला म्हणे, ‘अगा अजिता!
ऐसें कळतें, तरि हा जपता, तपता, तपोवनीं यजिता. १
‘अति-दुःसह उग्राचें तेज सकल-दुःसहींहि मदनीं, कीं
शामीं भीष्मांचें:—या जिंकाया काय शक्ति मर्दनीकीं? २
‘झटता तुझा सखा तरि होतें हित, परि न हा मनावरि घे.—
पतिसेंहि अकर्णधार- महिता उतरूं नदी न नांव रिघे. ३
‘वत्सें भीमें एकें काय करावें? न अंग राखावें?—
भगवति गदे! नमस्ते.—त्वां कितिकां, करुनि संगरा, खावें! ४
‘शक्रादि देव असते, तरि त्यासहि दाविनोंचि हात रणीं.
मत्तेज यापुढें किति? कीं मी खद्योत, भीष्म हा तरणी! ५
‘कळलें राज्य-सुख; पुरे. दे आज्ञा-दान—हा तपो रानीं.
थोरांनीं जोडावे तप- आज्ञादा, न हात पोरांनीं. ६
‘मजकरितां भ्रात्यांनीं वरिली, जोडुनि हात, पामरता!
श्रमते न हे जरि वना- माजि, न जोडूनि* हा तपा मरता? ७
‘शकुनीशीं द्यूतांत प्रागल्भ्य तसें तशा फळीं फळलें.—
संप्रति पितामहासीं करितां रण, काय फल नसे कळलें? ८
‘झाले सुयोधनाला भीष्म, द्रोण, प्रसन्न सुरतरुसे.

१यज्ञ करणार,-२फार असह्य,-३महादेवाचें,-४मत्- अनीक- माझ्या सेनेंत,-५धन्यासहि,-६सु काण्यावेरीज सोडलेली,-७नौका,-८नमः ते- तुजकारणें नमस्कार असो,-९मत्- तेज,-१० काजवा,-११सूर्य,-१२मंदाराद्रिपांचअमरवृक्षासारखे.

*“श्रमते न हे जरि वना माजि, न सोडूनि हा तपा मरता?”—असाही एक पाठ आहे.

व्यर्थ असुभगा[1] पतिसीं, सुभगेचें[2] आठवूनि झुरत, रुसे. ९
‘वांचो हें बल भीष्मा- करवीं; कैंवि कोण मारविल याला?
नेला गुरु-मर्द[4] येणें,— भगवंतें जेविं मारें विलयाला. १०
“गोविंद म्हणे, ‘प्रभुजी! कां, जी, श्रमतां शिरोनि शोकांत?
होऊँ कां तसा पराक्रम- विख्यात द्रोण,-भीष्म, लोकांत. ११
‘बुडती व्यसनीं थोरहि, होतां दुष्टां जनां पळ सहाय.—
केवळ न बंधु,—म्हणती, पाहुनि समरीं खळां, पळस-‘हाय!’ १२
‘लोक-त्रयांत निरुपम तुमचे भीमादि बंधु हे चवघे;
इच्छिति भवत्प्रसाद द्रुपद-विराटादि भूप ही अवघे. १३
‘जाणतसां द्रोणाला धृष्टद्युम्नाख्य दिव्य ओखद, हो.
भीष्माहि शिखंडी.—हें, दोन, अगद[11]-द्वय तुम्हांसि तोखद[12] हो. १४
‘वेचुनि[13] सर्वस्वातें, युष्मत्प्रिय[14]-हित करीन बहुधा मी.—
समयीं कसें चुकावें, तुमच्या भोगूनि भोग बहु धामीं? १५
‘तुमच्या पुण्य-गुणाचा न शतांशहि त्या सुयोधन-वराकीं.
कां भ्याला, जी? विजय- श्रीचा सुकृती[17] सुयोध नवरा कीं? १६
‘भीम, विराट, सपुत्र द्रुपद, सिताश्व, अभिमन्यु, सहदेव,
यांसि रणीं पृष्ठ[18]-प्रद होतिल शतपूर्व[19]मन्युसह देव. १७
‘आज्ञापावें आपण भीष्म[20]-द्रोणांतक स्वयें, देवा.

---

१ कुरूपास्त्री,—२ सुंदरस्त्रीचें,—३ ज्ञाता,—४ परशुरामाचा गर्व,—५ महादेवानें,—६ मदन,—७ होईना कां,—८ सकृदीं,—९ वृक्षविशेष,—१० त्वरित,—११ औषधयुग्म,—१२ तोषद,—१३ खर्चून,—१४ तुमचें,—१५ गृहीं,—१६ वराक-नीच,—१७ पुण्यवान्,—१८ पाठ देणारे,—१९ इंद्रासहवर्तमान,—२० भीष्मद्रोणास मारणारे, शिखंडी, धृष्टद्युम्न.

हे,वासवा हि जिंकुनि, करितिल तुमची रणांगणीं सेवा.' १८

"धर्म म्हणे,'श्यालक हो, प्रसवावें सद्यशौर्य-फ़त तातें;
सत्पुत्रेंहि करावें, जेणें होईल कीर्ति फ़तेता, तें. १९

'धृष्टद्युम्ना! माझा तूं, कीं तो स्कंद देव-सेनानी.—
पावावा जय अस्मत्- सेनांनीं,जेविं देव-सेनांनीं. २०

'बा! तूं द्रोणांतक हो; भीष्मांतक हो त्वदग्रज,शिखंडी;—
मधु-नाशक जेविं हरि; स्मर-नाशक जेविं देव, शशिखंडी.' २१

"ते बोलिले 'जसें तूं इच्छिसि, होइल तसेंचि,राया, तें.—
बहु हर्षसील विजयें—इन्द्र जसा औरसें चिराऱ्यातें.' २२

"रचिला दुसरे दिवसीं व्यूह,क्रौंचारुणाख्य, धर्मानें;
गरुड-व्यूह श्रीमत्- भीष्मानें—परमशत्रु-कर्मानें. २३

"तें भीष्माऽर्जुन-युद्ध स्तविलें सुर-सिद्ध-वर-समूहानीं.—
केल्या असंस्कृत रवि-रुचि- हानि,न केवळ निर्हीं चमू-हानी! २४

"तच्छर-पटलें बहुदा लोपे,प्रकटे,समस्त भानु;-घडी
उघडी पहावयास्तव;—जाणों उज्जेस्तव स्व-भा नुघडी. २५

"इन्द्र,तरुण-भीष्माऽर्जुन;—परि न रणीं न्यून, अधिक,ते गमले
सम लेखर्षि तयांतें जाणुनि, तद्भुज-पराक्रमीं रमले. २६

"भीष्म, स्तनांतरीं, श्री शौरि-शरीरीं शिताग्र शर हाणी;
झाणी क्षतेजें; कोपें आणी,तें,पार्थ-लोचनीं पाणी. २७

---

१ इंद्रास,-२ अतिविस्तृता,-३ तुझा वडील बंधु,-४ राक्षसविशेष,-५ स्वजातीय स्त्रीशीं विवाह करून तीचे ठायीं जो पुत्र झाला तो,-६ फार दिवसांनीं आलेला,-७ क्रौंच अरुण नावाचा,-८ पुनः पुन्हा,-९ आपलें तेज,-१० लेख-ऋषि-देव-ऋषि,-११ तीक्ष्ण अग्रें ज्यांचीं.—१२ रक्तें, * महादेव,—** षडानन.

“नारायण अजित जसा, अजित तसाचि त्रिविष्टपीं नर तो.–
रसनेसि म्हणेल कवण सुकवि-तदुत्कर्ष-वर्णनीं न रतो’? २८

“तात तुझा तेजस्वी मृत्युंजेयसाचि होय अजित रणीं.–
संबोधन प्रसंगीं, यासि म्हणेलचि सभेंत-‘अजि’-तरणी. २९

“जें सोडिति शस्त्र, म्हणे प्रेक्षक-सुर-नर-मदांसि-‘संपा’-तें.–
कंपातें भीष्मार्जुन देती अचळेसि शस्त्र-संपातें. ३०

“प्रेक्षकजनांत एकहि एकाचेंही लवेचि ना पातें!
प्राण हरहि, सुमनोहर! कोणा वदवेल युद्ध, बापा, तें? ३१

“धृष्टद्युम्न द्रोण- प्राण हराया प्रयत्न मात्र करी,
परि तो परिभव पावे.– होय कसा सिंह-विजय-पात्र करी? ३२

“झाला विरथ, परि न तो भ्याला कांहीं तशाहि उर्वरितें;
गुरु-शर-वृष्टि निवारित होता चर्मेंचि मात्र, उर्वरितें. ३३

“वारी नियंतिच! वारिल कुरु-गुरुच्या काय सायका ढाल?–
हेंचि तुम्ही साधु रसिक या दुग्धांतील साय काढाल. ३४

“तों भीमसेन, सोडुनि गुरुवरि शर सात, सोडवी, राया.
जाणों ते सप्तर्षी म्हणती–‘यश रक्ष; सोड वीरा या.’ ३५

“इतुक्यांत, सन्द्ध आले– द्रुपद, विराटहि–करावया समरा;
त्यांप्रति जाय म्हणाया जाणों-‘सार्थक करावयास मरा.’ ३६

“दुर्मद[१२] काळासि जसा लंघाया विश्वनायका लिंगा–

---

१ स्वर्गीं, -२ महादेवासारिखा, -३ पाहणारे, -४ पृथ्वीस, -५ सुंदर-मन हरणकरणारें, -६ गज, -७ महाअरातें, -८ ढालीनें, -९ राहिलेल्या, -१० दैवच, -११ बाणास, -१२ वाईटगर्व, -* जिंकेस.

प्रेरी भीमासि तसा लंघाया भरत-राय कालिंगा. ३७
"कालिंग-मथन करितां, सकळांसहि भीम रुद्रसा गमला.
श्रमला न लक्ष-मथनीं कथवे बहु युद्ध विस्तरें न मला. ३८
"शिरतां कलिंग-कटकीं, धरूनि करीं तो महा-भुज गदेतें,
देता झाला भय, जें भेके-कुळाला महा-भुजग दे, तें. ३९
"धृष्टद्युम्न तयाला धांवुनि झाला सहाय, सहसेन;—
चित्तांत म्हणे,'रुद्रचि हा. या प्रभुला कधींहि न हसेन.' ४०
"स्वरथीं वाहूनि म्हणे, 'मेले कालिंग सर्व, बा, हेरें.—
या मांस-कर्दमांच्या जावें आम्ही निघोनि बाहेर.' ४१
"सात्यकि, भेटुनि, शतदां जय! जय!-ऐसें स्मरवें वदे त्यातें.
आपण निवोनि, निववी पुष्कळ त्याही स्मरवेंच देत्यातें. ४२
"मग मथिले द्रौणीचे द्रुपद-सुतें, करुनि आहवा, वाजी;
त्यासि स्वरथीं घेउनि, शल्य म्हणे,'हा न राहवावा, जी.' ४३
"मारामार करिति मग कृप, शल्य, द्रौणि, हे तिघे त्यातें.—
विपिनीं वृक एकातें जेंवि स्ववधार्थ हेति-घेत्यातें. ४४
"करितो भवि-तापत्रय वारुनि जनि जेंवि—कंजनाभाचा
करि तेंवि, पार्षत-रिपु- त्रय वारुनि, लोकरंजना भाचा. ४५
"त्या अभिमन्युवरि उठे लक्ष्मण, नंदन सुयोधनाचा, हो.
सुर अप्सरांसि वदले, 'दोघेही हे सुयोध! नाचा, हो.' ४६

---

१ दुर्योधन, -२ वेडुक कुळास, -३ पहा, ४ चिखलाच्या, -५ युद्धास, -६ घोडे, -७ लांडगे, -८ तलवार, -९ कृष्णाचा, -१० अतिआनंद, -११ अरण्यांत.

"घे; साधु! साधु!-म्हणउनि, खंडुनि त्या जिष्णु-सूनु-चापानें,
वदले कौरव, 'आतां होतो हत जिष्णु,-सूनुंच्या पोतें. ४७
"सज्ज करुनि इतर धनु, भ्राताही कोपला-परोवासा.
शोकीं बुडवूं पाहे स्वावासा:-पर जसा परावोसा. ४८
"जेणें कुरवाळावें, लागे भ्रात्यासि तो विदाराया!
सांगो काय तुज तुझ्या पौत्रांचें युद्ध, कोविदा राया! ४९
"बंधूसि बंधु पाहे माराया- लावकासि लावकसा.
लाविसि परा सकृत् तरि, बोल, नृपा, आपणासि लाव कसा. ५०
"अन्योन्यासि विदारिति ते-खरतर-नरवर-सिंह-शावकसे.
लावकसे न म्हणावे;- तेजःसंपन्न मूर्त-पावकसे. ५१
"होय सहाय सुयोधन- राय, स्वबळासमेत, तनयाला.-
स्व-युगीं कलि कालजसा, पुत्रस्नेहें करूनि, अनयाला. ५२
"होय सहाय हरि जसा स्वसमर्थों तो स्व-नाम मंत्रास,-
पार्थ सुताशि तसा,-ज्या कोणापासूनि नसेचि संत्रास. ५३
"दैत्यांत प्रल्हादचि गावा; इतर न सुरोप गावे, गा.-
भीष्म कुरूंत तसा-हर होय पर-चमू-सुरापगा-वेगा. ५४
"मानवली न सुरलता, 'दुर्गाहि, विजय-धनुष्य-वल्लीला;
दिसतो मनुष्यसा जरि, तरि हि न याची मनुष्यवल्लीला. ५५

---

१ पुत्राच्या, -२ पतनें करून, -३ परकी यासारखा, -४ आपल्या घरास, -५ परकीयाच्या- शत्रूच्या घरास, -६ ज्ञात्या, -७ पक्षिविशेष, -८ अग्नीसारिखे, -९ मद्य प्राशन करणारे- दैत्य, -१० गंगेच्या ओघास-वेगास, -११ मनुष्यवत्- लीला, - ‡ एकदांही; ‡‡ अतितीक्ष्णनखेंज्यांचीं असे सिंहबालक.

"शतकोटि प्रति योजी जो मेरु-प्रभृति-शिखरि-तापार्थ,
शतकोटिगुणें तदधिक गमला, शर-निकर विखरितां, पार्थ. ५६
"अभिमुख झाले होते जे जे, ते पावलेचि पेर मरण.—
श्रीराम-राक्षसांचा तो, कीं हा एक होय परम रण! ५७
"सूं सणणण सणणणणण— वाजिति शर-निकर काय-हानिकर
वदले सुर, मुनि, 'करितो नररूपें रुद्र काय हा निकर!' ५८
"शरथी-जलधी फुटले; कीं दैवें पाश एकदां तुटले.—
ते काल-व्याल करटि- घोटक-भट-भेक खावया सुटले! ५९
"कवि, योजुनि उपमा गज- हय- नर-शर ततिस बाहुदळ, लाजो.
अतुल बल न कां, गर-गल- कलहीं हि न विजयि बाहु दळला जो? ६०
"देवासुराऽहव न बहु त्या कौरव-पांडवाऽहवाहून;
शोणित नदींत गेले- सुभट- रथ, द्विरद, वाहे, वाहून! ६१
"त्वत्तात, स्मित करूनि, द्रोणासि म्हणे, 'धनुष्य उतरा, हो.
शिबिरासि चला.-फिरवा दुर्योधन.-वत्स पांडुसुत राहो. ६२
'मेल्या फार; पळाल्या;-उरल्या दिसतात विप्रभा सेना.—
निकडे पुरे म्हणेसा नर— जेविं कलींत विप्र—भासेना. ६३
'केला अरि-जन विजयें—जैसा तो काम अछवि भवानें.—
बहुधा समर्चिला बहु- जन्म श्रीराम अच्छ-विभवानें. ६४
'अस्तासि भानु गेला; जावें आपणहि-काय राहुन, गा?

---

१ वज्र,-२ शत्रु,-३ शरीर नाश करणारा,-४ प्रलय,-५ बाते हेच कोणी समुद्र,-६ काळरूपी सर्प,-७ हस्ती- घोडे- योद्धे- एतद्रूप मंडूक,-८ देव-असुर- आहव-देव दैत्यांचे युद्ध,-९ हस्ती,-१० घोडे,-११ निस्तेज,-१२ महादेवानें,-१३ स्वच्छ आहे पराक्रम ज्याचा ऐशा अर्जुनानें,-१४ उत्तमप्रकारें पूजिला,-१५ कलयुगांत, कळहांत.

रिक्तचि गिळितांहि सकल निर्जरनिलया विकोय राहु नगा! ६५
"करिता झाला दुसरे दिवशीं, ऐसें वदोनि, अवहार, —
जो सर्वज्ञ सभेच्या कंठींचा अतुळ, विमल नवहार. ६६



## अध्याय ४

### तृतीयदिनयुद्ध.

"तिसरे दिवशीं, राया, भीमानें अतितरोग्र-कोपानें
दुर्योधन नृप मूर्छित केला, भेदुनि उरांत रोपानें. १
"सूत म्हणे, 'भीमाच्या— हरिच्या गजसा—न हा निमो हातें.'
पळवूनि, करी त्याच्या यत्न शतें शीघ्र हानि मोहातें. २
"सावध होउनि, राजा भीष्मासि म्हणे, 'अहो पितामह जी!
झाली भवत्प्रतिज्ञा काय, जना दे कथा पितां मह जी? ३
'असतां तुम्ही पति, पृथा- पुत्र मथिति या मदीय-पृतनेतें:—
कवल, ज्वलदनलाचें, सर्वस्वें, बल हरूनि घृत नेतें! ४
'जिकडे वपु, तिकडे मन युक्त-न शोभेल अन्यथा नातें.
पायें अनन्य लोटुनि, लावावें काय अन्य थानातें?' ५
"हांसूनि, पृथुल-जल-जलद- निभ-शुभ-नयनें, सलील, फिरवून,
पाहुनि कुयोधनाऽनन, शांतनव वदे, स्वकोप जिरवून. ६

---

१ शरीररहित, -२ मेरूस, -३ युद्धसमाप्ती, -४ बाणानें, -५ मरो, -६ मूर्छेस, -७ उत्साह, -८ ज्वलत्-अनल-जळत्या अग्नीचें, -९ स्वकीय, -१० कुयोधन-आनन, -✢ फारआहे उदक ज्यांत अशा मेघासारिखीं उत्तम नेत्रें, -✲ आर्द्र, ली लेनें.

'राया! भलतेंचि वदसि; पथ्य, हित स्वगुरुवचं न आइकसी.
अन्य असोत.-वदेल स्वसुताप्रति अहित वचन आइ कसी? ७

'युद्धीं अजेय[+] पांडव वज्र-धरा[++] सामराहि—असि वाणी
आम्ही शतदा कथिली; परि तुज ती लागलीच असिवाणी. ८

'कैसा जिंकावा, हो, करुनि बळें आहवा, युवा जीनें?—
बा! जिंकिला कधीं तरि जवनें[४] तरुणें हि वायु वाजीनें[५]? ९

'मी आजि सापजानुज- शक्रसुताचें करीन वारण, गा.—
बहु हें हि पद भारिहि जरि सारील अनेव[६] करी नवा[७] रणगा.' १०

"असि करुनियां प्रतिज्ञा, विष्णुपदी नंदनें, अति त्वरितें,
पांडव-चमू-पतीचें, मथुनि चमू, पाडिलें पतित्व रितें. ११

"वीरां न ओढवे गुण; तूणींच्यां सायकां न कर पावे!—
भीष्म ग्रीष्म-रविच! मग, तत्तेजें कांय कां न करपावें? १२

"दिसतें तेजो-मंडल जेविं जवें फिरवितां अलातातें,—
तेविं रथातें फिरवुनि, केलें; जवें दाविला भला तातें! १३

"जिकडे जिकडे पळती, तिकडे तिकडे महा जवन[१३] तो;—च्यु!
बहु 'हाय! हाय!' म्हणति प्राकृत; बुध 'हंत! हा!' यवन 'तोबा!'

"सर्वग[१४], सहस्ररूपी देव जसा देखिला गुरु-पद-रतें,—
भीष्म तसाचि परजनें जें भगवद्दर[१५] करी, कुरुप-दर[१६] तें. १५

गरुडहि अहींसि न तसा,—न करि-कुळालाहि तेविं हरि रवपवी,

---

१ खड्गासारिखी, -२ तरुण, -३ हट्टें, -४ घोड्यानें, -५ वेगवान्, -६ हट्ट, -७ रणांत आलेल्या तरुणगजास, -८ गंगा-सुत-भीष्मानें, -९ भाल्यांच्या, -१० शरीरें, -११ प्रज्वलित काष्ट, -१२ वेग, -१३ वेगवान्, -१४ सर्वत्रगमनज्याचें, -१५ भगवत्-दर-कृष्णाचा शंख, -१६ भीष्माचा शंख, -+ आजिंक्य, -++ इंद्रास, + गुरुहास.

दुर्योधनासि जैसा दे भीष्म, हरिस न तेविं हरि[१]ख पवी. १६
"धर्म-कटक, खांडव वन;-भीष्म, विजय;-विजय तोचि हरि गमला;-
शर, दव[४]; रक्त, ज्वाला;-रूपक याहूनि होय बहु न मला. १७
"पार्थ म्हणे, 'श्री कृष्णा! गारावें काय यास कटकांहीं?
हूं,-हाक, हाक;-धाक स्वजनांत उरो न, यासकट, कांहीं.' १८
"देव म्हणे, 'बैस बरा दृढ;-धर वळकट धनुष्यवल्लीला;-
रथ भिडवितों रथासीं.-आजि न बरवी मनुष्यवल्लीला.' १९
"ऐसें वंदोनि हांकी अजित-प्रेमळ कलाजित-रथातें.-
नसता दासजित प्रभु, करिता सारथ्य कां इतरथा तें? २०
"पडतांचि गांठि, झाले समर-चमत्कार, फार न वदवती!-
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत, कलशास दृश, नव दवती! २१
"छिन्न प्रथम त्यागुनि, जें सज्य करी नदीज तो धनु, तें
दुसरेंहि खंडिलें, हो, श्रीकृष्णसखें समस्त योधनुतें. २२
"भीष्म, प्रसन्न होउनि, करि बहु बीभत्स-वर्णना तुंडें:-
'का! केलें तुछ तुवां सद्रत्नांबर सुवर्ण नौतुंडें! २३
'वत्सा! भला भला! जय-पद, नारायणसखा नरा, हो, रे!
कीर्ति-फळीं किमपि उणे, करितां या रण-मखा, न राहो, रे! २४
'आणूं नकोचि चित्तीं, वत्सा! होइल दहांत कुत्सा-हें;-
जेविं त्रिजगद्गुरुसीं, तेविं करीं शक्र युद्ध उत्साहें. २५

---

१ इंद्रास,-२ आनंद, हर्ष,-३ वज्र,-४ वणवा,-५ अजय्य,-६ नूतन,-७ भीष्म,-८ सर्व योध्यांनीं स्तुत,-९ मुखें,-१० नासूनें,-११ महादेवाशीं,-* अन्यथा,-** घटासारिख्या,-*** अर्जुन.

“ऐसें वदोनि, हांसुनि, सुनि पुण गुण तिसरियासि तो चढवी,-
स्वमुखें सरहस्य जया राम धनुर्वेद आदरें पढवी. २६
“पार्थरथीं तो खर-तर शार, निज-धर्मीच्व दृष्टि दे, वर्षे;-
मुनि पुसति-‘त्या नगींची ती, कीं बहु हीन्व दृष्टि, देवर्षे?’ २७
“वाटे, तुमच्या उरविल कृष्णाचे जीव न स्थोविर तात.-
दिसले शरांत ते-नग कृत्यां बुधि-जीवनस्थ-विरतात! २८
“शांतनव सिंह गमला! पळतां नररथहि, तो पळे ससाच!
ससरव प्रभुहि वसंतीं बहु फुलला होय हा पळस साच! २९
“जों जों ह्मणी खर शार तो रिपु-यवस-दव तारकोपाया,
तों तों लागे, हळु हळु, कमळाधव-सदयतार-कोपाया. ३०
“मृदु पार्थ, उग्र केवल भीष्म-विजयवीर्यमत्त-पाहून,
देव म्हणे, ‘शैनेया! याचें तप फार मत्तपाहून! ३१
‘किति हा?-करीं सुदर्शन धरि तों! भीतील सर्व कां मग या?-
साक्षाद्विष्णुपदाहुनि पूर्ण करिल काय सर्व काम गया? ३२
‘आइकिला दुर्योधन- समरखळ रे, यादवा? नव्हाला जो
तापद, तो कालि तुच्छ! क्षणभानलें या दवानला लाजो! ३३
‘सकुळा गजा बहु बरें म्हणवितसे हा सुरोपम-दवस्था;-
करितो कसी, पहा, हे, ह्मणुनि मर्मी सुरोप, मदवस्था. ३४
‘मारिन भीष्म, द्रोण, प्रथम; मग वधीन खल शत रणीं.

१ गोवर्धनपर्वतावर जी इंद्रानें दृष्टि केली होती ती,-२ इन्द्र,-३ मलयकालच्या सागरोदकांतील,-४ पळणारा,-५ शत्रुरूपतृणाचा दवाग्नि ६ तारणाचा उपाय-कृष्णास ७ हे सात्यके,-८ विपुल्लता अग्नि,-९ देवासारिखा-अर्जुन १० वणव्यांतील

* ‘धरि तों’ धरीतों पर्यंत;-परंतु कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, ‘धरितों’ हा केवळ ‘धर’ धातूचा प्रथमपुरुषीं वर्तमानीं प्रयोग आहे.-

मूर्दें धरिलें माझ्या हे—जैसे सिंधुच्या कळश-तरणी। ३५
“गुरुपूरीं जेवि गजी स्वात्मोपत्य, न तसी अजा तारी.—
मर्दुनि ससहाय खळ, स्वपदीं बसवीन मी अजातारी.” ३६
“जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली,
तो भीष्मावरि कोपे—स्वमधुहराउपर जेविं सरघाली. ३७
“ऐसें वदोनि केलीं नयनें जैसीं नवीन कोकनदें.—
देवें कांपविलें बहु गर्जोनि—जसे तटस्थ लोक नदें. ३८
“चक्र करीं धरुनि, रथा- खालीं टाकुनि उडीस, जंव धांवे,
वाटे—त्या सिंहानें सर्वांहि भीष्मादि ते गज वधावे. ३९
“भारें लवे प्रतिपदीं भू; शेष धरूं शके न लवलीला;
भीष्माच्या मात्र मनीं ती प्रभुची दे न भीति-लेव लीला. ४०
“कोपें जें विश्वंभर, [illegible] भूमि-कंपादी;—
गडबडले सुर मुनि;—तें अर्जुन-सन्मित्र-कार्य संपादी. ४१
“धाउनि यत्नें धरि, परि ओढुनि ने त्यासि देव-ओढ कैसा.—
जाणो म्हणे—भुजबळें, पाहों, जरि ओढतोसि, ओढ कसा? ४२
“कर जोडुनि भीष्म म्हणे, “येतां मारावयासि? या, हो, या.
हा सत्यसंध केला; मुक्तहि; साधूंसि गावया होया.” ४३
“केला उभा सितास्वें, चरणीं घालुनि मिठी, पदीं दशमीं.—
प्रभु तत्व असें कळवी कीं, प्रेमबळें चि पद-नता वश मी. ४४

१ महापूरांत,-२ आपत्यासहित बालकास,-३ बकरी,-४ धर्म,-५ आपलें मधुहरणकरणाऱ्यावर,-६ मधुमक्षिका,-७ रक्तकमलें,-८ किनाऱ्यावरील,-९ नदीनें १० लवलेलीला,-११ लेश,-१२ दुश्चिन्हें,-१३ ओढणाऱ्यासारिखा,-१४ सत्यप्रतिज्ञाज्याची,-१५ ओव्या,-१६ दाहव्या.

"पाय धरूनि पार्थ म्हणे, 'त्यागुनि धन-कार्य[1],जीप्रति ज्ञाते
बहु जपले, तद्गुरुनीं त्यागाची काय,जी, प्रतिज्ञा ते? ४५
'या दासाकरवींच, क्षिप्र,[2]तुम्ही या यशास करवाल.—
नरवहि नको ज्या कार्या, त्या काढावा कशास करवाल[3]? ४६
'सारथ्य काय थोडें? हें याकरवींच कार्य करवा, हो.
न नदीजवर्थी, माझ्या सूर्य स्पर्शीच आर्य-कर वाहो.' ४७
"चक्र,क्रोध त्यागुनि, रश्मि धरा नीट; चालवा वाजी.—
बहु होंचि.-बोल माझा हा,न धरूनि वीट,चालवावा,जी.' ४८
"यापरि हित,प्रिय रथा- पुत्रोक्त अमान्य कां करील हरी?
सन्मित्रोक्ति करी जें, अमृत-नदाची न तें करी लहरी. ४९
"परते परम-पुरुष; मग, मित्र-रथीं वाजवी दरा. राहो
कौरव-भट-भीति-कथन.—होय स्करांतहि मह्य दरारा,हो.५०
"कोपोनि कौरवां वरि, सर्वांचा मद रणांत उतराया,
त्वरित महेंद्रास्त्रातें योजी,हो जी, महेंद्रसुत, राया. ५१
"बहु काय वदों, राया! तिसऱ्या दिवसाचिया चरम-यामीं[4],
भूमितळा मांसमया, देखत होतों नभा शरमया मी! ५२
"त्या अस्त्रें सप्तशत द्विप वधिले; दशसहस्र रथ मथिले."
ऐसे या युद्धींचे फार चमत्कार संजयें कथिले. ५३



---

१ धनरूपशरीर,-२ त्वरित,-३ तलवार,-४ चरम-याम- चवथ्याप्रहरीं.

## अध्याय ५

### चतुर्थदिनयुद्ध

“चवथे दिनीं, नदीचा सूत पार्थरथस्थ विश्वघटकातें
गांठी, आराधाया रण-यज्ञें, करुनि सिद्ध कटकातें. १
“तों, अभिमन्यु ज्येष्ठ- श्रेष्ठां ही विद्ध करि,-लहान पण;
सूर म्हणति, ‘कां जगत्रय जिंकुनियां, सिद्ध करिल हा न पण?’ २
“परि, सर्वांत पुढें होउनि, तुमच्या पिताचि पणतूतें.—
जाणो म्हणे-करिसि बहु कौतुक; लागेल दृष्टि पण तूतें. ३
“भीष्म म्हणे, ‘नर दोवा.’-तोंवि म्हणे पार्थ शांतनव दोवा.—
अन्यत्र शांत तो; परि कोणी हि रणांत शांत न वदावा. ४
“घाली तो पार्थासीं गांठि, रणीं, सर्व शस्त्र विद्ध रसा
किति तत्सेना कंपें कांपत करि सर्व शस्त्रविद्ध रसा! ५
“विजयाधिक भीष्माचा, परिहरितो सायकां, कडारवा तो
सूक्ष्मा हि रविकराहुनि बहुत तमा काय कांकडा खातो? ६
“क्षितिक म्हणति, ‘दावावी मल्ळ्यंनदाच्या पुढें किति नटें भा?
न नदीज हरिस्सरवासम! मेरूच्चहि भास्करासम न टेंभा! ७
“गंगेसि, एथेसि, किति स्तविती, जे जाणती बुध न्याया;
किति संत बोलिले कीं— दोघीहि त्रिभुवनीं सुधन्या या! ८
“हें युद्ध होत असतां,-दितिदनुतनुजांसवें जसा बळें हा—

१ परंतु, तथापि, –२ दारवबा, –३ सर्व-शस्त्रवित्-हर-सर्वशस्त्रें जाणणाऱ्या शिवासारिखा, –४ शस्त्रांहीं भेदलेली, –५ पृथ्वी, –६ कडाका, आवेश, –७ शाकवास; –८ तेज, –९ शिखर, १० दैत्यदानवांशीं, ११ बलहंन इंद्र

खल-हानिकर सुभद्रा- सुत करि शल्यादिकांसवें कलहा. ९
"द्रोणात्मजादिकांसहि सौभद्र, रणांगणांत, आटेना.—
वाटे- नौगांमध्यें हरि-शिशु, ज्या तिळहि धाक वाटेना. १०
"सरहस्य, अर्जुनासम, सर्व धनुर्वेद पाठ वीरा ज्या,
त्यावरि दुर्योधन बल पंचविससहस्र पाठवी, राजा. ११
"गर्वेंचि, बहु न देती पितृ-मातुल-सम-बला रिपु त्रास;
तदपि स्नेहें धांवे रक्षाया तो खलोरि पुत्रास. १२
"ते वेढिले चमूंनीं-जेविं, मदें, केसरी गज-घटांनीं!—
कीं, पूर्वपश्चिमांऽबुधि, शोषाया, वेष्टिले बहु घटांनीं! १३
"धृष्टद्युम्न प्रेक्षुनि तें, धांवे घेउनि स्वसेनेतें.
निस्तेज करी अरिबल, जें केलें शापुनी स्वसेनें, तें. १४
"केलीं कृप-कृतवर्म-प्रमुख-बलें पार्षतें पराभूतें.—
तीं त्या पाहूं न शकति-जेविं नृहरि-मंत्र-जप-परा भूतें. १५
"शल्यसुत, महारथ, मग वधिला द्रुपदात्मजें-महातेजा.
स्मरले सुर देवीहत- महिषास-गदाहता पहाते ज्या." १६
वृद्ध म्हणे, "रे, संजय! मज न परोत्कर्ष परिसवे.-चावे
कर्णा अहिसा.-हाहा! मद्भट बहु त्यांहि परिस वेंचावे! १७
"मत्सुत-जय-वांछेला सुमत-जसा कांत-संग रामेला.—
आम्हाकडील जो भट, म्हणसी तो, करुनि संगरा, मेला. १८

---

१ गजांमध्यें, - २ खल-अरि-अर्जुन, - ३ वाहिणीनें, - ४ पराभव पावलीं-ऐशीं, - ५ तत्परास, - ६ पर-उत्कर्ष, - ७ संपाये, - ८ स्त्रीस, - ९ योद्धा, - १० युद्धास, - + गुह्यासह.

"न सुचे उपाय; जो जो मज्जन-रण-यज्ञ-दक्ष-तो खचला.
अन्योन्य मदसुक म्हणती, 'जावें;-जाण्यांत लक्ष नोरेव, चला'.१९
"सहज स्वहित बहु घडे तृष्णा; उच हि न मला उपाय-शतें.
जें अमृतरसा येतें, येइल, बा, काय, गा, तुपा यश तें? २०
"मत्प्रत्ययासि आलें विदुर कवि भविष्य कथित होता तें.
पुत्रहितार्थ करावा जो, केला म्यां न यत्न तो-तातें." २१
संजय म्हणे "खळाच्या परिणामीं उक्ति बहु असारा ज्या,
त्यांसि न भुलतासि, तुझा कां होता घात हा असा राजा? २२
"शोकाब्धि दूर आहे; निर्गता आलासि, बा, परिसरा या.
येल्हांचि व्याकुळ कां? स्व-पर-जन-क्षय-कथा परिस, राया. २३
"पार्षत समरीं वदला शल्या-'धृत-पुत्र-नाश!'-कोपाया;
मग ते करिते झाले अन्योन्य-प्राण-नाशकोपाया. २४
"होतें बहु; परि यशी सत्वर अभिमन्यु पार्षता, राया.-
राम-यशोग्रंथ-शतीं, क्षम जीवा जेविं आर्ष ताराया. २५
"मद्रपतीसीं भिडतां, अद्भुत सामर्थ्य कंज-नाभाच्या
करिता झाला युद्ध प्रेक्षक-जन-चित्त-रंजना भाच्या. २६
"शल्याचे कैवारी, भ्राते दुर्योधनादि, दश होते,
त्यांवरि उठतां, गमला क्षुबुभुक्षु व्याघ्र भीम, शश हो ते!
"भीमापुढें गजाऽयुत केलें, टाळावया स्वघातातें;

---

१ मत् -अस्‍-माझेप्राण,-२ तोष, आनंद,-३ मुक्ता,-४ नदी, पर्वत इत्यादिकांच्या जवळची भूमि,-५ हे पुत्रनाश धारण करणाऱ्या!-६ परस्परांच्याप्राणनाशाच्याउपायास,-७ ऋषिप्रणीत,-८ पाहाणारे,-९ अतिक्षुधित.

गमलें—यूथ हरिपुढें पाठविलें यूथपेंचि, ताता, तें! २८
"जाय लयासि गजायुत, तें ज्याचें तो हि मागध, रणीं, हो.—
जो भीम गदाभस्थर, सिद्ध करवें तो हिमाग-धरणी, हो. २९
"सर्व-गजघ्न-वृकोदर-वीर-गदा-भीरु अभ्रमु रडेल;—
भीमावरि दिगिभ-शतहि, न श्वसनावरिहि अभ्र, मुरडेल. ३०
"गज-दशसहस्र वधितां, भीम भुजांला नसे लवायास
आग्रह करिति अशाच्या चरणीं त्वत्कृत कसे लवायास? ३१
"सर्वा हि चमू प्रेषी राजा भीष्म-क्षयार्थ-कृत्यासी;
तीतें मर्दूनि, करी हर्षें तो—रुद्रसा चि—नृत्यासी. ३२
"घेती पार्षत, सात्यकि, अभिमन्यु, द्रौपदेय, हे यश तें.—
भीमार्थ प्राण हि ज्यां हर्ये.—कथावीं कशास हेय शतें. ३
"तो सोमदत्ति सात्यकि वारिति अन्योन्यसैन्य शैवाला
दे शैव वैष्णवाला, कीं वैष्णव जेविं दैन्य शैवाला. ३४
"धांवे कुरुपति, कीं तो कौरव त्या यादवें न मारावा.—
त्यावरि भीम उठे, हो, करुनि शिवासिंहसत्तमारावा ३५
"वेधी बहुबाणांहीं भीमास; तसें चि त्या विशोकास;—
धनुसहि; तों, पवनें म्हणे, 'हूं घाल, खलांतका शिशो! का
"भीम धनु छेदी तों, दुर्योधन अन्य चाप सिद्ध करी;
वेधी मर्मींच; पडे मूर्छित तो—जेविं सिंह-विद्ध करी. ३

---

१ गजसमुदाय, -२ यूथपतीनें, गजेंद्रानें, -३ हिमालयाच्या धारणांत, -४ इंद्राची स्तीण, -५ दिग्गजांचेंशत ६ वायूवर, -७ लव-आयास-तिल मात्रश्रम, -८ साज ९ शिवा-सिंह-सत्तम-आराव-भवानीच्या सिंहोत्तमाचा ध्वान, -१० वायू, -११ हे पुत्रा

"तों झांकुनि बाणांहीं त्वत्तनयकृत विजयस्कृत पुरोगम जे
तें म्हणती, 'साधुपुढें दाविसि मरणार्थ, खल-गुरो! मगजे. २
"इतुक्यांत भीम उठला — क्षुधित गुहांसकृत[1] सिंहसा — राया,
त्वत्कृत-गज-मद, होतां साह्य, सकल दिगिभमदाहि, साराया.[*] ३
"धाराधर[2] जेविं नगा[3] — झांकी सोडूनि भीम शर भांधा[4]. —
त्या तो भी — जैसा गज भीतो सिंहासि, — सिंह शरभा वो. ४
"शल्याहि पळे कृयोधन — सांचि, समर्पूनि सर्व शर भाच्या;
त्याच्या[*] दृष्टिपुढें अरि न टिकेल चि — जेविं सिंह शरभाच्या. ५
"सांपडले भीमाला त्वत्कृत — मृग जेविं आठ वाघाला. —
देवासि आठवा कीं स्वोघाला[6]; हा न आठवा घाला. ६
"भीष्म म्हणे, 'भीम धरा; घ्यावि तुम्ही सर्व वीर तरसुंडी[7]; —
दुर्धर योग धराया जैसी देतात धीर-तर मुंडी[8].' ७
"भीमावरि भगदत्त स्वगजा — परिभूत[9] हिम नगा — टकली;
मोही तन्मन[10] — जैसें साधूचें पूतहि[11] मन गाढ कली. ८
"तो झांकी भीमातें — अश्ममय[12] पोथोद जेविं तरणीतें. —
आढ्य[13]-कुलीन-जनाचें दावी औदार्य जें वित्तरणी[14] तें. ९

---

१ गुहेंत निजलेला, -२ मेघ, -३ पर्वतास, -४ बंधूस, -५ अथवा, -६ स्व-अघ-पल्या पातकास, -७ तुटून पडणें, -८ शिर-सन्यासी वा, -९ जिंकिला आहे हिमालय पर्वत ज्याणें ऐसा, -१० तत्-मन-भीमाचें मन, -११ पवित्रहि, -१[२] घ, -१३ अतिधनी, -१४ दानाच्या ठायीं.

* 'त्वत्कृत गज मद हंता, शक्त सकल दिगिभ मदहि साराया.'
असाहि एक पाठ आहे.

५ 'त्याच्या दृष्टिपुढें अरि न टिकेल. — टिकेल हरिहि शरभाच्या !' — असाहि एक पाठ आहे.

“भगदत्त[*] वाहन[1] वात्या[2] ऐरावत-करि-कुळींच जननेन[3] गजा.
सौभद्रप्रमुखांतें घन[4] वदले पाहणार-जन-नग[5] ज्या. १०
“पावे कुसुमित-किंशुक-घन-वन-पिहिताऽद्रिपाल-सादृश्य[6];
भीमाऽश्विनासि झाला—मार्कंडेयास कालसा—दृश्य. ११
“जेविं स्फकविगुण झांकुनि दृष्टि, कराया सकंप[7] शिर, कविला—
शिकवी मारुतिला[8] भग-दत्तें हृदयांत-बाण-शिरकविला[9].१२
“सिंधुजला कुंभ जसा—जो शत्रु बलासि दक्ष साराया,
तो थांबला घटोत्कच—दिव्य[10], निधानस्थ यक्षसा-राया.१३
“मायो-रचितैरावत-[12] द्विड्-नागारूढ तो पलाश[13] मन
बहु कांपविता झाला; तैसें न कधीं हि कोपला शमन[14].१४
“तैसेचि वामन-महा-पद्मांजन-नाम दिक्करि-तिलकसे,
त्यावरिहि; खचर[15] ते मग भगदत्तातें न धिक्करितिल कसे.१५
“आपणचि आपणास व्यसनीं गोवी सदंतकर[16]तेजा;—
पावेल जय कसा तो, पीडित हो, वीस[17] दंत-कर[18] ते ज्या? १६

---

१ वाहन,-२ प्रचंड वायु,-३ उत्पत्ति,-४ मेघ,-५ पर्वत,-६ फुललेल्या पळसाच्या निबिड अरण्यानें आच्छादित हिमालय पर्वताचें सादृश्य,-७ कंपायमान,-८ मरुत्-वायु-त्याचा पुत्र भीम जो त्यास,-९ शिरकविलेला,-१० देवरूप, सुंदर,-११ द्रव्यावर बसलेल्या-यक्षासारिखा,-१२ कपटानें केलेला ऐरावत,-१३ मांसाहारी-राक्षस,-१४ यम,-१५ गगनचर देव,-१६ सत्-अंतकर-तेज-साधूंचा अंत करणारें तेज ज्याचें,-१७ मायारचित ऐरावत, वामन, महापद्म, अंजन, या चार दिग्गजांच्या ४ शुंडा, आणि प्रत्येकाचे ४ दंत एकंदर २० दंतकर.

*“भगदत्तवाहना त्या ऐरावतकरि कुळींच जनन गजा.—
सौभद्रप्रमुखांतें घन वदले पाहणार जन; नग ज्या.’
भगदत्तवाहना गजा ऐरावतकरि कुळीं जनन ज्यास पाहणारे जन नग वदले; आणि सौभद्रप्रमुखांस घन वदले.—असाहि एक पाठ आहे.

"स्वगजांसहि भी तो गज, मारित येतां चहूंकडुन चवघे.—
अहि[1]दष्ट-भ्रांत पुरुष जेंसा मानी गहूं कडु, न चव घे. १७
"भ्रमला, पळावयासहि नच तो भगदत्त-सिंधुर[2] क्षमेला[3];—
जाणों ह्माहि ह्मणे, 'हरि! तूचि दया-शक्ति-सिंधु, रक्ष मला.' १८
"जाणुनि भगदत्त-गज-व्यसनासि तयाच्चियाचि हाकांनीं,
भीष्म द्रोणासि ह्मणे, 'आला कीं आर्त[4]-शब्द हा कानीं? १९
'बहुधा भिडतो ऐरावत गत हत[5]-विश्वरूप-गल बलें[6] हा.—
भगदत्ताचा करितो, होउनि गजराज आर्त[7], गलबल हा. २०
'रक्षावा प्राग्ज्योतिष[8]'— ऐसें बोलोनि वृद्ध तवकानें[9]
ते कांहीं गेले जों, ओळखिला यातु[10]-शब्द नव कानें[11].[12] २१
"वृद्ध ह्मणे, 'गा द्रोणा, अनृत न ह्मालों, करूनि पण तुंडें[12].
शक्र नव्हे; युद्ध तुमुल करिजेतें आमुच्याचि पणतुंडें[13]. २२
'भीमतनूज, घटोत्कच,—राक्षस—न धरील आमुची भीड;
कीं तात धर्म ह्मणतो, "वत्सा! किति निस्र पुससि? हूं, भीड." २३
'सरले तीन प्रहरहि, उरला अवकाश अल्प चरमा या.
होइल घटोत्कचाची माया—जसि शेष-तल्प-चर[14]-माया. २४
'झालों सर्वहि सक्षत, समरश्रांतीं श्रांत वाहन[15] भ्रमलों;
परतों, चला, स्वशिबिरा जाऊं; पाहूं उद्यां; बहु श्रमलों. २५

---

१सर्पानें चावलेला,-२हत्ती,-३शक्तिमान झाला,-४दुःखिताचा शब्द,-५छेदिला आहे विश्वरूप ब्राम्हणाचा गळा ज्याणें,-६बलराक्षसास मारणारा-इंद्र,-७दुःखित, पीडित,-८देशविशेष-एथें तद्देशपति भगदत्त,-९क्रोधावेशानें,-१०राक्षस,-११कर्णानें,-१२तोंडानें,-१३चवथ्यास,-१४शेषरूप शैय्येवर गमन ज्याचें त्या विष्णूची माया,-१५ श्रमलीं आहेत वाहनें ज्याचीं.

"ऐसा करूनि विचार, द्रोणासह शीघ्र तवपिता परते;
कुरुकटकाला बहु भय देती, गर्जूनि सिंहसे, परे ते २६



## अध्याय ६

### पंचमदिनयुद्ध

भूप म्हणे; "हित-मंत्र न, कानांत क्ष्वेडरस न ओता हे,—
ऐसें विदुर मज जसें सांगत होता, तसेंच होताहे. १
"हत-शेषें मदपत्यें पळतीलचि-जोविं पाडसें दूर
पावेल श्रीच्यांशीं ज्येष्ठेचा केविं पाडे सेंदूर? २
"असतां द्रोणादि, भीष्मादि, कटकें होतात कां पराभूतें?
केला असेल भीमें व्यूह—जसा बाळ कांपरा भूतें. ३
"मज सांग, संजया, ते ज्या सामर्थ्यें रणीं न भंगति, तें.
करिते झाले काय स्त- मणि-मंत्रोषधि-रसज्ञ-संगतितें? ४
संजय म्हणे; "कृतैक श्रित-सर्व-स्वर्द्रु-शौरि-संगति ही.
कां, जी, करिजेल इतर मणिमंत्रौषधिरसज्ञसंग तिहीं? ५
"धर्मेंचि तरति पांडव, बुडति अधर्मेंचि सर्वकौरव, हो.—
पौरव हो! सुकृतें जय, कुकृतें क्षय! हा प्रसिद्ध रौरव, हो. ६

---

१ शत्रु, -२ विषरस, -३ मरूनराहिलेलीं -४ लक्ष्मीच्या सेंदूराशीं, -५ लक्ष्मीची वडील बहीण अवदसा तीच्या, -६ किंमत, योग्यता, -७ कृता-एक, -८ आश्रितांचा सर्व कल्पतरु जो कृष्ण त्याची संगति, -९ पराभवपावले. ळीं ऐसीं, -* भ्याड, कांपणारा. -** 'श्रीच्याचा' असाहि एक पाठ आहे: श्रीच्यासेंदुराचा.

"ऐसेंचि पुसे तत्कृत त्यासि; वृथा श्रम तथापि ताराया
सज्जन शिरोमणि तुझा सांगे ऐसी कथा पिता, राया:-७
'मंदर-शिखरीं सोमर चतुरानन देव, एकदां, राहे;
वाहे स्वनिल; अकस्मात्, दिव्य-विमानासि तो नभीं पाहे.८
'सर्वोव्याहि ललाटीं ज्याचें सर्वज्ञ पाणि-कंज लिही,
"जय जय!" म्हणे, उठे; तो प्रभु जोडी, क्षिप्र, चार अंजलिही.९
'देवहि तसेंचि करिती, परि पाहों न शकतीच तेजातें;
बहु विनयें विधि विनवी, होतांचि अदृश्य पुसतिते ज्यातें.१०
'विधि वदला, "स्मर हो, तें पुसतां तरि सांगतों चि;या, परिसा.-
परि सावध व्हा; लागो, शौचि छाया, हृदय-लोह या परिसा.११
"तें ब्रह्म! पावलों त्या सद्गुरु नाभ्यंबुजांत जनना मी.
त्याचि प्रभुच्या पावति पुरुषार्थ समस्त कृज्ञ जन नामीं.१२
"वदलों प्रभुप्रति असें- दिधला, विश्वंभरा! भरोसा जो,
तो सत्य असो; असुर- क्षतजें विश्वंभरा भरो, साजो. १३
"भू-भर-नाशास्तव अव- तार, जगन्नायका! मनावरि घे.-
सिंधूंत पराहितापिक धरूनि मनीं काय काम नाव रिघे?
"वदला प्रसन्न-वदनें प्रभु कीं, 'सकदेन सोम-संतानीं.-
बहु मानिजेल माझा रूयशोनिधि, जेविं सोम संतानीं.१५
'होइन वसुदेव-तनुज, मी, नारायण, वरीन नरतेंतें,

१ स-अरम,-२ स्व-अनिल- सुखकारकवायु,-३ कर-कमल,-४ शंद्र,-५ हे विष्णो,-६ पृथ्वी,-७ नौका,-८ चंद्रवंशी,-९ चंद्र,-१० नरपणास.
* नाभि-अंबुज- नाभिकमलांत,-** जन्मास,-+ रक्तें.

स्वयशः श्रोत्यांचें मन अन्यत्र पळहि करीन न रमे तें. १६
'होतिल शीघ्रचि सर्वहि सदहित दितिसुत, सदानव, असून
आर्तावन न करिन कां प्रभु मी, भुजबल सदा नव असून? १७
"मेत्वाश्रित न म्हणेलचि कोण्ही कोण्हाहि-देवता नावा.-
विपदुत्तारक भक्तें हा एकचि वासुदेव वानावा." १८
'यापरि सुरांसि सांगे विधि जे गुरु आपणासि देवर, हो.
देव-रहस्य वृत्त असें- तोचि प्रभु रेवतीष्टदेवर, हो. १९
'हें देव-रहस्य मला, प्रिय म्हणउनि, जामदग्न्य आर्यकवी;
नारद, मार्कंडेय, व्यासहि:-वदतील अनृत काय कवी? २०
'कंसांतक, नारायण! नर, अर्जुन! हे अजेय विश्वास,-
हें तुज कथिलें शतदां, परि मद्वचनीं तुझा न विश्वास. २१
'हा श्रीकृष्ण प्रभु ज्या पक्षीं, तेथें समस्त कल्याण;-
याचा प्रसाद होतां, सिंहीं घालील शशहि पल्याण! २२
'नर-नारायण-शस्त्र-ज्वलनीं कुल इच्छितोसि वेराया?
दुर्योधना! खरा तूं राक्षस! न करील अन्य वेरा या. २३
'सुजनासि बिभीषणता रुचते, कुजनासि तुज दशाननता.
अनता जना शिवे रे संसारीं ओरवेटी दशा, न नता.' २४

---

१ सत्-अहित-साधुद्वेषी, -२ दैत्य, -३ दानवासहित, -४ असु-ऊन-प्राणरहित, -५ आर्त-अवन दुःखितांचें रक्षण, -६ नवीन, -७ सेतु-आश्रित, -८ विपत्तींतून तारणारा, -९ सिंहावर, -१० ससाही, -११ खोगीर, -१२ मत्तास, गर्विष्ठास, -१३ वाईट, -१४ मणतास-नम्रास, -* देवाचें गुप्त वृत्तांत *बलरामस्त्री रेवतीती चा इष्टदेवर-दीर-कृष्णजोतो ‡ गुप्त ‡ परशुराम.

* 'प्रभुदेवनिष्ठ देवर हो.' असाहि एक पाठ आहे; परंतु त्याचा अर्थ बरोबर लागत नाहीं-

"सम-सत्य-प्रिय-हित हें गुरु वच गणिलें स्वलें विषम, राया!
केलेंहि मंद सुख; जणो—पाजित होता बळें विष मराया. २५
"प्रावृट्-प्रिय भेकांच्या कां न गमे सुरभि मानसा गेर, गा.
क्षुद्र नदी जसि धरिती, तसि न धरी दुरभिमान सागरंगा. २६
'काळा पुढें त्वदनयें ओगरिलें स्व-कुळ-ताट! कळलें कीं?
कां बसलासि उगा? जा. नृप-मंडल सर्व ताट कळेलें कीं?' २७
"असि शयनाज्ञा होतां, जाय निजाया तुझा तनय, नमुनी.
भीष्महि शयनीं पहुडे—जैसा मीलित सुजात नयन मुनी. २८
"राया, भीष्माला जें सुख, इतरां तें दुराप, गा, स्वापें.—
आत्मस्थिति निववी जसि, तसि ततासि न सुरोपगा स्वापें. २९
"पंचम दिवसीं रचिला मकर-व्यूह त्रिमार्गगा-तनयें;
श्येनव्यूह सितोश्वें—लोकमतें, मन्मतें,—तुझ्या अनयें. ३०
"देवव्रतें महास्त्रें योजुनियां मोडितां स्वकटकातें,
'हूं; हय पितामहावरि हाक,'—म्हणे पार्थ विजनघटकातें. ३१
"कुरुपति म्हणे गुरुप्रति, 'भीष्म, तुम्ही घ्याल जरि मनावर, हो,
जिंकाल काळ-बलही; नाहीं कांहीं तुम्हा अनावर, हो. ३२
'जाणति सर्वहि तुमची छात्रीं पुत्रीं, समान हृदया-तें.
पावो प्रताप-रवि, पर- मदेहातें मथुनि, उदयातें.' ३३
"सात्यकि समस्त पांडव- कटक द्रोणें शर-व्रजें मथिलें;

१ बंद,-२ वसंतकाल,-३ विष,-४ सागराप्रतगमनकरणारीमहानदी,-५ त्वत्-अनय-तुझ्याअपराधानें,-६ निद्रेनेंडोळेताठणें,-७ उत्तम,-८ निद्रेनें, ९ गंगा,-१० स्व-अप्-आपल्याउदकानें,-११ गंगा-तनय-भीष्मानें,-१२ अर्जुनें,-१३ शिष्यानेठायीं,-१४ मद-ईहा-मंदझालाआहेउद्यमज्यांचा ऐसांतें.

द्रवलें—जसें द्रवावें, तत्काळ, हुताश-तापितें कथिलें. ३४

"शैनेयहि, दृष्टिपुढें येतां, केला पळांत जिगजिग, जी.—
राहेल कसी कौस्तुभ- मणि पाशीं मणिकांत झिग झिग जी.

"तें भीम म्हणे, 'भीतें अन्यें विसरूनि नया न राखावें;
या ब्रम्ह-राक्षसें परि मज-देखत तों न या नरा खावें.' ३६

"गुरु-शिष्य खरे कोण्ही म्हणती, कोण्हीहि तें सज्जन लटिके;
त्या गुरु कलह-कलिपुढें श्रीभीमाचाचि तो भुजे नल टिके. ३७

"तों भीष्म धांवला; कीं, हरितचि आला समस्त विप्र-भया;—
अभिमन्यु म्हणे कृष्णा- तनुज्यांतें, 'तात हो न विप्रभ; या.' ३८

"इतुक्यांत शिखंडी ये, कीं पावावे परिश्रम न भाचे;—
उल्काऽश्रुपात कथिती, कवि शून्य म्हणति परि, श्रम नभाचे. ३९

"तो भीष्मातें गांठी—जैसा पाथोद पर्वतातें, हो.
तुमच्या मानियलें तें स्त्रीचेष्टांचेंचि पर्व तातें, हो. ४०

"स्त्री-पूर्व म्हणुनि भीष्मचि न नया, परि सर्व मानवे शस्त्री;—
त्यजिली जाणों यतिनें धृत-मोहन-गर्व मानवेश-स्त्री. ४१

"केली शरकाम-बोधें हृत-दर्पा रुचिर-विग्रहा रंभा.—
तसि भीष्माम-द्रोणें अंबा—कृत-रुचिर-विग्रहारंभा. ४२

"भीष्माकडे सुयोधन सकटक ये पार्षतास पळवाया;

---

१ अग्नीनें तापविलेल्या, -२ भुजरूप नल राजा, -३ प्रभारहित, -४ ज्वाला, न भ्रांत क्षणभर राहणारें तेज—ज्यास तारा पडला असें म्हणतात, ५ मेघ ६ धरिला आहे मोहनाचा गर्व असी राजस्त्री, -७ हरण झाला आहे गर्व जीचा, -८ मनोहर शरीर जीचें, -९ केला आहे फार वेळा पासून युद्धाचा आरंभ जीणें, -+ जर्जर.

धांवुनि पार्थ म्हणे,'स्हा माज्या रोपांत[1] पांत[2] पळेवा, या.' ४३
"कौरव-समूह, येतां चालुनियां कृष्ण[3]-सारथि, गळाला;-
हरि-भयें[4]-दीर्ण नभ करिल घड, लावुनि कृष्णसार थिगळाला?
"हे भासले-करिति रण, इच्छुनि सुर, दैत्य, दानव, सुधेतें[5];-
कीं प्रलय-जलद देती, वृष्टि करुनि, शैत्य-दान वसुधेतें[6].४५
"भीष्म-श्वेताश्वांचा निरुपम मज वाटला तडाखा तो.-
कीं ब्रम्हगोल वाटे विशिखांहीं[7] दाटला तंडा[8] खातो! ४६
"कुरुबल-नलिन[9]-वनातें भीम गज, निकार[10] आठवी, रगडी.-
पाठविला काळानें जाणो, थापटुनि पाठ, वीर गडी. ४७
"मर्मीं शर हाणुनि, धनु तोडुनि, भीष्मचि तया दटावी[11], हो.-
श्वश्रूपुढें[12] स्नुषा[13]-गुरु- शक्तिपुढें शक्ति नच नटावी, हो.४८
"सात्यकिच्या सूतातें[14] बसवी, छेदूनि मस्तक, विमानीं;
वांचविला भगवत्प्रिय शैनेय-असें समस्त कवि मानी.४९
"घेऊनि रथ पळाले भीष्म-शर-त्रस्त-वातसे-वाजी;
घडली तयांसि पतिची, चुकवुनि तो प्राण-घात, सेवा, जी.५०
"गुरुपुत्र अर्जुनावरि धांवुनि हाणी उरांत सायक सो[15];
नायक साधूंचा तो न म्हणेल तशा रणांत 'हाय!' कसा?
"गुरुसुत गुरुसम,-परि निज- धर्म म्हणुनि, करुनि कठिन मन कांहीं,
कनकांहीं पूजावा, तो पूजियला व्रणोर्तिजन[16]कांहीं! ५२

---

१ बाणरूपरोप्यांत.- २ शुष्क कडबीच्यापात्या,-३ अर्जुन,-४ सिंह भयानें फाटलेलें,-५ अमृतास,-६ पृथ्वीस,-७ बाणांहीं,-८ झोंका,-९ कमल,-१० अपकार,-११ धमकावी,-१२ सासूपुढें,-१३ सून,-१४ सारथ्यास,-१५ साहा,-१६ क्षतदुःखउत्पन्नकरणारांहीं- बाणांहीं.-

"खंडी चापातें कीं, न तया अयशः[1] प्रदासि विप्र भजो;—
मित्रें पदार्थ मित्रा न धरूं द्यावा करील विप्रभ जो. ५३
"पुच्छच्छेदें अहिसा— चापच्छेदें करूनि बहु खवळे,
तो गुरु-पदाभिमानें— ऋषि[2]-वर-तेजोघ्न जेविं नहुरव-वळे. ५४
"सजुनि धनु दुजें, सोडी विशिखांची विप्र समहिमा नवेती;
गमली करील पार्था- सह भस्म क्षिप्र समहि[4] मानव तीः ५५
"जगदीश्वरास हि म्हणे, 'न रुसें,- हे तूंहि विशिख सप्तति[3] घे;'-
त्रिजगद्ग्रसनोत्थानल[5]- सम गमले ते प्रकोप[6]-तप्त तिघे. ५६
"तो निज-गुरु-सुत म्हणुनि, न दे परिभवः दे तयास कधि टाळा:-
सांगे जना असें—यश रक्षा, बहु कोप करूनि न विटाळा. ५७
"प्रार्थुनि देवासि म्हणे तो पार्थ, 'अहो दयानद! पिटाळा.
यद्यपि नयेंचि देऊं, द्यावा या गुरुसुता तदपि टाळा.' ५८
"द्रौणिप्रति सोडुनि, तो कौंडी कौरवबलासि शर-भवनीं;[7]
भिडले रणांगणीं मग दुर्योधन, भीम,— जेविं शरभ वनीं. ५९
"अभिमन्यु सुयोधन-सुत- लक्ष्मण-मुख, विरथ करूनि, बहु मळवी;-
नलवीर-[8]भीम-कलिला नोंद्वि[9]धिसा-प्रबळ कृप तया पळवी. ६०
"भट दशसहस्र उठले, जे आज्ञा-कर सुयोधनाचे. हो;
त्यां—हरिणांसि हरि तसा— मर्दुनि, सात्यकि सुयोध नाचे, हो. ६१
"भूरिश्रवा तयाचे लीला-लेशें वधी दश सुत रणीं.

---

१ अपयश देणारास,—२ ऋषिश्रेष्ठांच्या तेजाचा नाश करणारा, ३ नद्यांची संख्या,—४ भूमिसहित,—५ त्रिजगत्-ग्रसन-उत्थ-अनल-त्रिजगत् ग्रासणारा जो शिव त्यापासून उठलेल्या अग्नीसारिखे,—६ अतिक्रोधानें तापलेले,—७ शररूपगृहांत,—८ नलराजापासून भ्यालेला कलि त्यास,—९ त्या नळाचें दैवासारिखा.

तच्छक्ति,तारुनि श्रित, घे-जैसी सागरीं यश सू.तरणी. ६२

"पुत्रघ्न-रथासीं रथ भिडवी सात्यकि,पकांत,आवेशें;
भट त्यासि निवाराया शकले न-जसे रवीस आवे शें. ६३

"हय,सूत मथुनि झाले ते यदु-कुरु-वंश-नलिन-रवि पत्ती.-
राया,असीच समरीं झळिति शुचि नर,न मलि नर,विपत्ती.६४

"देतील मान-धन ते पद मागें-खड्ग-चर्म-पाणि-कसें?
व्यसनीं तेज न सोडी कुलज-हृदय,पावकांत माणिकसें ६५

"घे भीम सात्यकीस स्वरथीं,कीं शत्रु-वश सुयोध न हो;
तेसेंचि सोमदत्तिस, जोडाया शत्रु-वश सुयोधन,हो." ६६

सूतें कथिलें पंचम- दिवसींचें युद्ध अतुल रायास-
कविनेंहि आपणास व्यसन-धिधि-भवांत उद्धरायास. ६७



# अध्याय ७

## षष्ठदिनयुद्ध

"षष्ठदिनीं धर्म रची जो व्यूह परांसि तो खरा मकर;-
होय श्रितांसि जेसा देणारा अभय,नीरव,राम-कर. १

"वा, अनुसरोनि धर्म- द्वेष-दुरभिमाने-वश-कुजातातें,

१तत्-शक्ति,- २आश्रित,-३सू-तरणी-उत्तमनौका,-४मडक्यांचे आवे, भट्ट्या,-
५शंभर,-६अग्नींत,-७संजयानें,-८आनंद;+मलिन
९ धर्मद्वेषाच्या दुरभिमानास वश झालेल्या नीचास, दुर्योधनास.

रचिला क्रौंच व्यूह, व्यर्थ,महा-पंडितें,तुझ्या तातें. २

"द्रोणासि भीम गांठी प्रथम रणीं,भीष्म जेविं रामास;

पावे जन प्रतापें[1] त्या ततिदिषुग्रीष्मजें[2] विरामास[3]. ३

"गुरु-सूत-मथन करितां बहु भीम-शरांसि मानवे[4] शमन[5];

होतां स्वयें स्वसारथि, गुरुसहि लोकेश-मानवेश-मन. ४

"मर्दी शत्रु-चमूला, शौर्य-मदें बहुत मातलीला,जो,

तो शक्रहि लाजे; मग कुरु-गुरुला कां न मातली[6] लाजो? ५

"कां,जी,रडतां? स्मरतें कीं विदुर-हितोक्त आयकाना तें?

येणार पुढें पुष्कळ, आलें आतां चि काय काना तें! ६

"गुरुसि त्यजुनि,व्यूहीं भीम–त्रिपुरीं जसा हर-शर[7]-भरे;

भट वदले,'आला धृत- राष्ट्र-सुत-हरि-प्रभा हर[8] शरभ[9],रे'. ७

"त्यसुत म्हणति,'धरावा,'न जगेचि पिपीलिकांत[10] अहि[11] तरणा;

जाळीं मृगसा–आला व्यूहीं हा आयताचि अहितें[12] रणा. ८

"कौरव-भट-लक्ष तया–जेसें सिंहासि न करिल क्ष तरे;

भीम म्हणे त्यासि,'गदा हे गगनालाचि न करिल क्षत,रे'. ९

"त्यजुनि स्वरथ गदाधर वीर वृकोदर करी कदन,राजा.

होय प्राप्त विमदपण[13] त्या,होता शक्तिचा मद नरा ज्या. १०

"कोणाचेंहि न चाले कांहीं त्या प्रलयकाल रुद्रसमीं;

---

१ अत्यंततापें,-२ तत्-इषु-ग्रीष्म-ज- त्याच्या बाणरूप ग्रीष्मापासून उत्पन्न झालेल्या,-३ अंतास,-४ सारथ्यानें,-५ यम,-६ इंद्राचा सारथी,-७ शिवाचा बाण,-८ स्र्योधनरूप सिंहाची कांती हरण करणारा,-९ भीमरूप शरभ,-१० मुंग्यांत ११ सर्प,-१२ शत्रु,-१३ गतमदत्व.

गणिता झालों, पाहुनि तें युद्ध, तदन्य सर्व उद्देस मी. ११
"धृष्टद्युम्न व्यूहीं साह्यार्थ शिरे, म्हणे, 'अहा! यास
काय म्हणावें! करितो, त्यजुनि सहायास, दुःसहायास.' १२
"दूर ध्वजासि पाहुनि, ओळखुनि स्यंदनासि, आटोपी;
तो न दिसे जो म्हणता स्वगदेला-'शत्रुसिंधु आटो, पी.' १३
"पाहुनि सूतासि रथीं, गर्हियरुनि म्हणे, 'अहो विशोक, मला
कमलाकरप्रियरहित अरुण, तसाचि प्रकार हा गमला. १४
'कोठें तो, ज्या शत्रा कांपति होउनि सयोध-नग दीन?
ज्यासि म्हणे न मुखें, परि चित्तें मानी सुयोधन 'गदीन'? १५
"वदला विशोक, 'एथें स्थापुनि मजला, गदेसि धरुनि करीं,
शिरला कौरव-कटकीं-जैसा झंझा-समीर तरु-निकरीं.' १६
"धृष्टद्युम्न म्हणे, 'तरि जातों स्वसख्याकडेचि.-कां परतूं?
विपयीं कैसा, देहीं शिरतां भयशोभयोत्थ कांप, रतूं?' १७
"यापरि वदोनि धांवे, देखत देखत गदा-हत-गज्यांतें;-
गुमले ते नग, न निघे, सोसूनि कुलिशोत्थ दाह, तग ज्यातें. १८
"अवलोकिला वृकोदर कुरुकटकीं-सागरांत मंदरसा.-
रुञ्ज अधिक वीराख्या, अमृताख्या मानितात मंद रसा. १९
"क्षिप्र रथावरि वाहुनि, बाहु निववितें सख्यास भेटोन;-
गमला शमला न मला, सर्वांसहि, दवं दवींत पेटोन. २०

१ नीरस;-२ दुःसहश्रम;-३ कमल-आकर-प्रिय-रहित-कमलसमुदायाचा प्रीय जो सूर्य त्यारहित;-४ गदाधरणारा श्रेष्ठ;-५ समुदाय;-६ पर्वत;-७ वज्रापासून उत्पन्न झालेला;-८ वीरनामक-रसास;-९ रसास;-१० वणवा;-११ अरण्यांत.

“भ्रात्यांसि म्हणे कुरुपति, ‘बहु करुनि म्हणवितों असि हाय;-
झाला खळा खळ- गदा नित्यदिवास्वापसा परिसहाय. २१

“दुष्टा धृष्टद्युम्ना माराचि, चहूंकडूनि कोंडा, हो;
कण हाचि शस्त्र-शूर्पा उरला, पांचाळ-संघ कोंडा हो.’ २२

“वर्षति धृष्टद्युम्नीं त्वत्सुत, म्हणवे न त्यां अघन, राजा;
परि कंपद न च झालें- जैसे यम भट नसे अघ नरा ज्या. २३

“मोही प्रमोहनास्त्रें पांचाळ, न लाविता हि घटिकेतें;
पहिलें व्यसन-धन तसें त्वन्नंदन-देह-भान न टिके तें. २४

“सभ्रात्यांसह केवळ तो पांडु-कुमार-नग-नद भ्रमला;
तद्बृदयाहुनि गमलें साभ्रामारात्रिगगन दभ्र मला. २५

“हाहाकार परिसुनि, द्रोण, द्रुपदासि शीघ्र भंगूनीं,
धांवे- जेविं विनविला कांतारीं करुण अंध पंगूनीं. २६

“विनिवारी प्रज्ञास्त्रें गुरु शिष्य-ज्ञान-बळ-विनाशास्त्र;-
धन काय;-काय तेंही, जें स्वजन-व्यसन पळविना शास्त्र? २७

“त्वत्सुत, सावध होउनि, धांवति पार्षत, वृकोदर दमाया
प्रकटिति शर-वृष्टि तसी, असुर सुरांवरि जसी दरंद माया. २८

“तों धर्म म्हणे ज्या, ‘ध्या भीमाच्या, मथुनि अरि, समाचार,’-
ते त्यासि म्हणति, ‘दावा शशासम, हो, यान; हरि-समा चोर. २९

“सौभद्रप्रमुखांनीं कुरु-सेना, जेविं वायुनीं तरणी.-

---

१ संगास,-२ निरंतरदिवसी निद्रेसारिखा,-३ सहाय,-४ मेघनव्हेत,-५ पातक,-६ पांडव रूप वृक्षाविषयीं-नद-दुर्योधन,-७ स-अभ्र-अमा-रात्रि-गगन- अभ्रसहित अमा वास्येच्या रात्रीचें गगन,-८ लहान, अल्प,-९ अरण्यांत,-१० भयदेणारी,-११ सिंहा सारिखा,-१२ हेर,-१३ नौका.

कीं, कामविकारांनीं कांपविली कामिनी, नवी तरणी. ३०
"केकेयरथीं भीमा स्थापुनि, तुमच्या सुतांसि सोडून,
धांवे धृष्टद्युम्न द्रोणावरि, शर गुणासि जोडून. ३१
"गांठी प्राणहराया पान्यातें स्पर्श जों न करि पातें;-
त्वत्सुत सांडुनि, गुरुतें-त्यजुनि मृग, जसा मृगेंद्र करि-पातें. ३२
"करितां विरथ, विशस्त्र, त्रिदेश म्हणाति, 'कां न नागविल याला?
त्यावाचि गुरु क्षोभें शिष्य,- खगेंद्रेंहि नाग,-विलयाला.' ३३
"त्या संकटांत त्यातें दे अभिमन्यूच एक थारा, हो.
परिसा भीम सुयोधन रुन-कलह-कथाचि, हे कथा राहो.
"गमले भ्याते-खातो वाघचि, वासून वदन, घाघाला.
सर्वस्वनाश जेणें, तो यादृनि कोण, यद, नवा घाला. ३५
"अन्योन्य देत होते, सुरसे कीं, मोह, कंप; दानवसे.
त्यांत प्रीति-ब्रम्ह- घ्रांत जसी तिलहि संपदा, न वसे. ३६
"सौभद्रादि-रथांच्या न सहाति त्वत्तनूज पल वेगा;
पळतां मागें लागे भीम, मग पदहि तयां न पळवे, गा. ३७
"देते झाले वीर सुभद्रा-कृष्णा-कुमार मारा ज्या,
त्या पाहूनि, 'असावे ऐसे,'-म्हणती उमा, रमा, राजा. ३८
"वातें घनसा-अर्जुन- शर-निकरें विसकटे कटक-बंध;-
जाणों-सन्मरण-महा- लाभें बहु नाचले भर-कबंध. ३९

---

१ करी-प-गजपतीस,-२ देव,-३ सर्प,-४ देवसे,-५ ब्राम्हणवध करणारांत,-६ प
ळभर,-७ प्रहारास,-८ ऐसेपुत्रअसावे,-९ शिररहितशरीर-

"अर्जुन तुमच्या खपवी– असुरांच्या जेविं शक्र–सैन्यातें;
त्याच्या भीष्म बला दे–देवांच्या जेविं वृत्र–दैन्यातें. ४०

"धांवे दिनावसानीं, धरुनि मनीं भीम-मथन-कामातें,
जो मानी म्हणतो–'यम- पुर-पथ हित, साम-पथ नका मातें. ४१

"भीम म्हणे, 'ये, मंदा! तुज मी मारीन, भारतापसदा!
खल-जनकें पावावा, वाकुनि, गुरु-शोक-भार-ताप सदा. ४२

'जरि न पळसिल, मारिन आतां तुज,–शत्रु तूं, न भाऊ, खळा!
उरवळा धर्मासि म्हणसि, तरि म्हणसिल बालिशा नभा उरवळा

'तुज वांचवील विधिहि न, वर घाया जरिहि तप नव रचील,
किति लोकप, शनि, कवि, गुरु, बुध, मंगळ, चंद्र, तपन, वरचील! ४४

'वपु न बहुत पोषावें, यशाचि सदा खाय ज्या न कीनाश;
बुध होउं दे प्रतिज्ञा- नाश न,–अज जेविं जानकी-नाशा. ४५

"ऐसें आधीं मर्मीं ताडी अति ताप-जनक-वचनांहीं,
मग इषुंहीं–ज्या न फुटे ऐसें कोठेंहि घन कवच नाहीं. ४६

"चाप, छत्र, ध्वज, रथ खंडी; मारी तुरंग, सूत रणीं.–
पाहोंहि न दे, पसरुनि शर-किरण-सहस्र भीम भूतैं रणीं. ४७

"रोप शिरोनि शरीरीं न वसति,–जेसे स्फविभ कुग्रामीं.
उग्रा मी त्या तेजा स्मरलों, जें बाणकोटिमुग्रामीं! ४८

---

१ त्या अर्जुनाच्या बळा सैन्यास, –२ इंद्र क्लेस, –३ दुर्योधन, –४ भारतांतनीचा, –५ उन्मूलन पावा, –६ लोकपाल, –७ वरकडही, –८ यम, –९ अजच्या- रामचंद्र, –१० घोडे, –
११ सारथि, – –१३ भूमिगत सर्प, –१४ बाण, –१५ बाण-कोटि-मुक्- राम-
बाण कोटी सोडणारा जो राम त्याच्या ठायीं.

"पळवी कृप नृपतीनें, होय जयद्रथहि आडवा, राया ;–
असतां आयु न हो कां क्षम पळ जलधीस आडवे वाराया ?
"म्हणतो–बक–शत्रुपुढें झालाजयलाभ सिंधु-राजाला,–
जरि कवि म्हणते मत्ता सिंह-पुरस्थाहि सिंधुरा ज्याला. ५०
"परतें, स्मरासुररणा- ऽदर करुनि दरिद्र, शांतनव सांजे ;
तेंही–पावत आले, ज्याच्या षडराति शांत, नवसां जे." ५१

---

## अध्याय ८

### सप्तमदिनयुद्ध.

"भीष्मासि म्हणे राजा, 'व्हावी ऐसी रणांत मदवस्था ?
झाला मला सुदुःसह हा, ऐसा होय ताप न दवस्था. १
'शिरला भीम व्यूहीं–जेविं अज-कुलांत लांडगा शिरतो ;
दैवेंचि रक्षिलें मज,–कापित होताचि दांडगा शिर तो ! २
–'या तुमच्या पावाव्या, दुर्बल सेना समान, वध सेना !
हें ज्ञात्या कां स्वर्गीं, जोडुनि एनांस, मानव धसे ना ? ३
'साधालचि लीलेनें कार्य तुम्ही, ध्याल जरि मनावरतें ;
आवरिलें अंतरंरिपु[11]- बल, बाह्य कसें तुम्हां अनावर तें ? ४
"भीष्म म्हणे, 'हा, वेड्या ! मंदेंचि रणांत आंग गरवावें.

---

१कृप,–२गजास,–३वांचला,–४स्मर-असुर-रण-आदर,–५अस्तमानीं,–६कृष्णार्जुन,–७षड्वैरी,–८मत्-अवस्था,–९वणव्यांत पडलेल्यास,–१० पातकास,–११कामक्रोधादि शरीरस्थरिपु.

घ्यावें अपयश, टांकुनि यश-अमृत त्यजुनि, कां गरा[1] खावें? ५
'धर्मासि कोण जिंकिल? अनुकूल तपोब्धि[2]-विप्र सर्व तया.
हे जरि सहाय असते, हांसूनि म्हणते हरीस पर्वत[3]-ज्या'. ६
'या रहें तुजपाशीं, बा, शतदां मारिल्याचि हाका या.—
किंबहुना[4], त्यजिल, यथा- शक्ति भिडोनि, तदर्थ हा काया[5].' ७
"बोले ऐसें, लावूं न शके कोण्हीहि दोष धीरा ज्या;
राजासि विशल्य करी, देवुनि इलुशीच[6] ओषधी, राजा. ८
"सप्तमदिवसीं व्यूह त्वत्तातें, मंडलाख्य, नव रचिला;
आचविलें भवदन्त्रा, मग गुण-दोषा मनांत न वरचिला[+]. ९
"धर्में रचिला वज्र- व्यूह विदारावया अरि-नगातें[7]
मग तुमुल युद्ध झालें, देवा, जें, श्रुत तुला करिन, गा, तें. १०
"झालीं युद्धें शतशः सर्व-प्रेक्षक-मनोहरें[9], सरसें[10];
होय रणांगण रक्तो- त्पल-चयें[11]-चित-पद्मराग-भू-सरसें. ११
"करिती त्रिगर्त-पति-भट शर-पटलें केतुसह रथा पिहित[12];
ते यद्यपि परम अहित, मानी श्रीकृष्णसख[13] तथापि हित
"उडवी शर-पटलासह पार्थ स्वशस्त्र्यां, त्रिगर्तपातें, जीं.—[*]
होय अवस्था त्याची ति अंधा रात्रिं गर्त-पातें[14] जी. १३
"शर-पटलांतूनि निघे- घन-पटलांतूनि अर्यमासा[15]च;

---

१ विषास,-२ तपाचेसागर,-३ इंद्रास,-४ अधिकतरकाय,-५ देह,-६ थोडी,-७ पर्वतास,-८ हे धृतराष्ट्रा,-९ सर्व पाहाणान्याचीं मनें हरण करणारीं,-१० वीररस युक्त,-११ आरक्तकमलसमुदाययुक्त- माणिक्य भूमिवरील सरोवरासारिखें,-१२ आच्छादित,-१३ अर्जुन,-१४ खळग्यांत पडून,-१५ सूर्यासारिखा,- * अजी. + अन्या

रिपु-वाहिनींत तरतां भासे तो वीर-वर्य मासाच. १४
"पळतां म्हणे सुशर्म- प्रमुख नृपांला सुयोधन,'रहा, रे.
कां भ्यालां रे? हारे सुरहि, न केवळ सुयोध नर हारे. १५
'उठला धनंजयावरि भीष्म, पहा; व्हा सहाय; या, परता;
लेशहि पलायन-रता न सुरव असे, किमपि अन्य- पापरता. १६
"या दुर्योधन-वचनें धीर धरूनि परतले सकल शस्त्री;—
नव्हतीच भेटली परि त्यांला गृह सोडितां सकलश स्त्री. १७
"उठतां कुरुवीरांचे लागों देती जना न थाक थवे;
झालें युद्ध तुमुल, तें आठवितां मज न ती कथा कथवे. १८
"करितिल विराट-कुरुगुरु- सम तरुणहि इतर न कलहा निकरें;
सोडित होते शस्त्रें, अन्योन्य वधार्थ, सकल-हानि-करें. १९
"होउनि विरथ, सुत-रथीं बैसुनि, सात्मज विराट युद्ध करी;
जोडी सुत-शोक, न जय; भी-हरिला जोवि अप्रबुद्ध करी. २०
"विकळ करि शिखंडीतें गुरुसुत-खग-पति जसा महा-भुजगा;
स्वरथीं घेउनि रसी त्यासि रणीं सात्यकी महाभुज, गा. २१
"घाली गांठि अलंबुष राक्षस, जो वीर्य-मत्त मायावी,—
कीं, कीर्ति आपणा, अप- कीर्ति तया वृष्णि-सत्तमा यावी. २२
"चाप छेदी, भेदी मर्मी;-निर्मी घडींत शत-माया;
शैनेय म्हणे,'भीतिल भगवद्रविदासकिरण न तमा या. २३

---

१ नदी-सैन्य हि;-२ समुदाय,-३ गरुड,-४ कपटविद्या जाणणारा,-५ यादव श्रेष्ठ-सात्यकीस,-६ भगवत्-रवि-दास-किरण,-७ अंधकारास.

"विजयातें द्रास्त्रा त्या शकल्या बहु बलवती हि न दमाया,
जेविं गुहाचें रामा- नमिति तयाचें दुरूनि पद माया. २४

"शर-तति गमे पसरिली झांकाया पापयातु पासोडी;
सुर म्हणति पळों देतां,'कैसा हा वन्हि या तुपा सोडी?' २५

"साहेल काय! वाटे- जातो मर्मी शिरोनि शर-भाला;
धाकें पळे अलंबुष- जैसा भ्याला मृगारि शरभाला. २६

"धृष्टद्युम्नें तुमच्या, विरथ करुनि, नुरविलेंचि बळ लेंकीं.
वाहे रथीं शकुनि ओसि- मात्र-सहाया नृपासि,- कळलें कीं? २७

"कृतवर्माहि पळविला विरथ करुनि-परम भीरु पामरसा.
भीमा भी कौरव-बल बहु-जेसें पाप रामनामरसा. २८

"भागी-पुत्र, इरावान,-सत्कीर्ति, सरस्वती, सदरविंद,-
तेणें, नृपा, पळविला अनुविंद जसा, तसा सदर विंद. २९

"भगदत्तें हि घटोत्कच, विरथ करुनि संगरीं, पळविला, हो.-
शक्रें प्रतापभास्करां जेविं; तसा पांडवां कळविला, हो. ३०

"पीडी भाच्यांसि रणीं, दावी बहु मद्र-पाल कौशल्य;
मुनि वदले,'मामेवं पीडय, पापाय, बालकौ, शल्य!' ३१

"सहदेव विरथ होउनि, नकुल-रथावरि चढोनि, कोपानें
शल्यासि करी मूर्छित, वक्ष विदारूनि तीव्र-रोपानें. ३२

---

१ अलंबुषाच्या माया,-२ शरपंक्ति,-३ पापी राक्षसरूप-पासोडी,-४ मृग-अरि-सिंह,-५ न-उरविलेंचि,-६ तलवार,-७ सभय,-८ तीक्ष्ण बाणानें,-९ स्त्रिया.

* 'शल्य! पापाय, एवं बालकौ मामा पीडय'. हे शल्या! पापास्तव, या प्रकारें बाळकांस नको-नको पीडूं.

"धर्में श्रुतायु राजा— शरभें मृग-राजसा च्चि—कांपविला
*सत्तेजचि अतिदुःसह—ऐसें म्हणति ल न तज्ज्ञ कां पविलो? ३३
"कृप, चेकितान, होउनि विरथ, परस्पर धरूनियां असितें,
पडले मूर्छित; उठले,—निज-शत्रु मुखें कशावया असितें. ३४
"वर्णिति जसें कृपाचें सामर्थ्य, तसेंचि चेकितानाचें;
प्रेक्षक-मन तद्रदता युद्धें हरि—जेविं केकिता नाचें. ३५
"कृप काढिला शकुनिनें,—करकर्षे चेकितान, लवलाहें;—
पाहे हा त्वद्दास— व्यास-पदाब्जद्वयास लवला—हें. ३६
"त्वत्पुत्र विकर्ण, दुजा दुर्मर्षण, चित्रसेन तिसरा, हे
वधितां, उगाचि अर्जुन- सुत, भीमा करुनियां नातिस, राहे. ३७
"पार्थ म्हणे, 'देवा, त्वां केलें जें रक्षणा इभांच्या, तें
धावन करूनि रक्षीं भीष्मापासूनि, आजि, भाच्यातें.' ३८
'भीष्म-ग्रीष्मतरणिसा— दुःसह अतरुणहि बाढ कलहातें;
धरितिल हय भय जरि, तरि मम रथ तदभिमुख, बा, टकल हातें.'
"स्वर्गींहि नसे ठावी शत्रुपुढें विमुख चाल वीरा ज्या,
त्यासि 'अवश्य'—म्हणे प्रभु-रथ भीष्माभिमुख चालवी, राजा. ४०
"तेव्हां युधिष्ठिरादिक झाले सर्वहि सहाय जिष्णूस;—
जेविं स्वशत्रु-शमनीं शतमख-मुख सुर समस्त जिष्णूस. ४१

१सत्—तेज—साधूचें तेज,—२ तेंजाणणारे,—३ वज्रास,—४ कांळीं,—५ मयूर-समूह,—६ नृत्यानें,—७ नृपविशेष,—८ गजाच्या,—९ अत्यंत,—१० अर्जुनास,—११ इंद्र प्रमुख देव,—१२ विष्णूस.

*'त्वत्तेजचि अतिदुःसह—ऐसें म्हणतील तज्ज्ञ कां पविला?' असाहि एक पाठ आहे.

"पाहों न शकति डोळे त्या भीमाच्या गदेसि देवांचे ;-
त्वत्पुत्र,चित्रसेन, स्व-स्यंदन-रत्न तीस दे,वांचे. ५०

"पळवी बंधु विकर्ण, स्वरथीं वाहोनि,चित्रसेनातें.
झाल्या चित्र-सम क्षण, तेव्हां,पाहोनि चित्रें सेना तें. ५१

"तों धर्मावर धांवे गांगेय-जसा त्रिलोचन रविवर ;-
ज्योचें सहस्रनयन न पाहे,पाहेल काय नर विवेर? ५२

"झाले धर्मशर नदी- ज-शरांच्या साह्यते न वेगा ते.-
टिकले न रूरर्षिपुढें जैसे मदवाहते नवे गाते. ५३

"होउनि विरथ,युधिष्ठिर नकुल-रथावरि चढे,अस्त्रव पावे;
माद्रेयासि म्हणे,'हूं ,- घ्या; वृद्धाचे रणीं अस्त्र खपावे.' ५४

"भंगी धर्माज्ञप्त-नृ- प-शत-शरांचें नदी-सुत पटल तें;
हे किति?-न त्यास त्याचें, काळासीं भिडवितां,सुतपु टळतें. ५५

"तो-तालफल-निकरसा-पाडी कौंतेय-भट-शिरो-निकर:
नुरवी अहित-बल-जलधि- जल घटजाच्या जसा शोषिनि कर.

"गांडुनि म्हणे शिखंडी जरि असकृत,'तिष्ठ,तिष्ठ,'-पाहेना;
स्त्री-पूर्व म्हणुनि-रंभा- ऽभिमुख शक मुनींद्रसा नि-राहेना. ५७

"करूनि अनादर त्याचा, शिरला पांचाळ-वीर-लक्षांत
कक्षांत दाव-पावक-किंवा,श्रीराम जेविं रक्षांत. ५८

"ऐसा पाहोनि परम- निरुपम संग्राम सातव्या दिवसीं,

---

१ आश्चर्य,-२ महादेव,- ३ ज्याप्रीष्यानें,-४ इंद्र,-५ छिद्र,-६ गर्ववाहते,-
७ शिरस्-निकर- मस्तकसमूह,-८ कुंभपुत्र- अगस्त्य,-९ पुनःपुन्हा,-१० साहा
राहा,-११ गवतांत,-१२ राक्षसांत.

झाली महेंद्रनयनें, अहिपति-नयनेंहि ऐकतां, हिंवसीं[1]. ५१



## अध्याय १

### अष्टमदिनयुद्ध.

"अष्टम दिवसीं, राया, प्रकुपित[2] खग-मृगवरासम रयेंङ्ग[3]—
कौरव-पांडव-सैनिक करिते झाले बरा समर-यज्ञ. १
"करिती युधिष्ठिराच्या ज्या ज्या गर्जोनि वाहिनी[4] दाटी,
त्यांसि अमित-प्रताप श्रीभीष्म-ग्रीष्म कालसा-आटी. २
"भीष्म-भय-भग्न झाले बहु भट, टिकला वृकोदरचि, राया;
व्याघ्र कसा व्याघ्रोदर[5] चिरिल? क्षम[6] तो वृकोदर[7] चिराया. ३
"चुटकीं तचि नाराचें[8] सूतशिर वृकोदरें उडविलें, हो,—
तों भीष्म-यश हयांनीं[9], स्वैरंग[10] होऊनियां, बुडविलें, हो! ४
"वधिले सप्त सुत, नृपा, रडवाया बहु तुझ्या सुना भवनीं[11].
सोस प्रथम-वृकोदर-शर दवे[12] भवदंगभवसूनाभवनीं[13]. ५
"साश्रु, सशोक, सुयोधन ऐसें वदला पितामहापाशीं:—
'अजि, शक्ति असोनि, पडो देइल संतति पिता महा-पाशीं?
'मारूं दिलीं कसीं, हो, भीमास रणांत आठ नातुंडें?

---

१शीतल-२अत्यंत कोपलेले,-३वेगजाणणारे,-४सेना-नदीहि,-५व्याघ्र-उदर,-६श क्त,-७वृक-उदर लांडग्याचें पोट,-८बाणें,-९घोड्यांनीं-१०स्वच्छंदगति,-११गृहांत,-१२दवाग्नि,-१३भवत्-अंग-भव-सू-नाभि-वन-तुझ्या अंगापासून उत्पन्न झाले त्यांच्या उत्तम नाभिवनांत.

काय तुम्हांसि म्हणावें,-करितां नय-पठन-पाठना तुंडें. ७

"हांसुनि भीष्म म्हणे,'हित कथिलें पहिलेंचि आयकाना तें;
सांगा,झालें तुमच्या तेव्हां,आतांहि,काय कानातें?८

'सत्यप्रतिज्ञ,दुर्जय- तक्षकसा-भीमसेन कोपन,हो;
हा कोप ईश्वराचा,-याचा कोणावरीहि कोप न हो! ९

'कोणें विनिवारावा बल-शाली भीम,युधिष्ठ-दंतकर?
बा,यासि तक्षकाचे, गुरु म्हणउनि, जोडितील दंत कर.१०

'होय न जातां दीपा- वरि कोणहीही पतंग जय-शाला.-
बा, पावला कधीं तरि हरिसीं झगडुनि मतंगज यशाला?११

'चुकलासि प्रथमचि तूं; आतां होईल काय हा कांहीं?
आम्हांला तों नाहीं राखायाचा स्व-काय हा कांहीं.१२

'आतां निपटुनि राज्य- स्त्री-जीवित-पुत्र-कामना सोडा;
जोडा स्वर्ग;स्वर्गा- हूनि निपट लाभ भूमिचा थोडा.१३

"ऐसें सुयोधनासीं वदतां,गंगासुतास माराया
ये धर्म-चमू;भासे क्षुब्धाब्धीच्या उतासमा,राया!१४

"झाली मारामारी तेव्हां आम्हांत त्यांत,देवा! जी,
पाहुनि तीस तरणिच्या एकहि पाउल पुढें न दे वाजी.१५

"अर्जुनपुत्र,इरावान्, बहु-कुरु-वीरांचिया यशासि हरी;
मारी शकुनि सुतातें लीलामात्रें-जसा शशासि हरी.१६

---

१ अतिकोपिष्ट,-२ युधिष्ठ-अंतकर,-३ जय स्थान,-४ स्वदेह,-५ क्षोभलेल्यास समुद्राच्या,-६ हे धृतराष्ट्रा,-७ घोडा,-८ सिंह,-९ सूर्याचा,-

"त्यानें बहुमायावी नक्तंचर, आर्ष्यशृंगि, तो खपवी;
दुर्योधनासि दे अरि- मथनें-शक्रासि जेविं तोरव पवी. १७
"गर्जे कुपित घटोत्कच, भिववी आम्हांसि मूर्त अंतकसा;
त्यासीं स्रयोधन भिडे.-सेनेचा साहवेल अंत कसा? १८
"मथन करुनि बहुतांचें, विकळ करी फार तो पलाश मन.-
वाटे-राक्षस-रूपें सर्वांवरि आजि कोपला शमन. १९
"तों, द्रोणासह धांवे भीष्म, कराया स्रयोधनावन, हो.-
लोकीं म्हणेल कोण स्वामित्राणें स्रयोध नाव न हो? २०
"गगनीं शिरोनि गर्जे, सर्वांसहि दाखवून हान रणीं;
वाटे-पाडितसे शर न,-कराया राखऊन हा तरणी. २१
"धर्म म्हणे भीमाला, दूरुनि त्या आयकोन आरोवा,
'वीरा, वत्स घटोत्कच नाशावा,-शत्रुनीं न मारावा. २२
"सौभद्रादि स्रुतांसह धांवे तो भीम-भूतनायकसा.-
सिंहत्रस्त हरिणसे- कौरव म्हणती,'विचार काय, कसा? २३
"तेव्हां, नृप, स्रयोधन शोधी भीमा-जसा उरग उरगा,-
किंवा, व्याघ्र व्याघ्रा-भेदी खरवरें शिलीमुखें उर, गा. २४
"अवलंबुनि ध्वजातें, भीम क्षणमात्र वेदना साहे.-
नसतां धृति, प्रतिष्ठा केंची म्हणतात वेद नासा हे? २५
"त्या भीमावस्थेतें पाहोनि, घटोत्कचादि जे स्रुत ते

१ राक्षस, - २ राक्षस, - ३ यम, - ४ स्रयोधन- अवन- दुर्योधनाचें रक्षण, - ५ हा घटोत्कचरूप- सूर्य, - ६ ध्यानास, - ७ शिवामारिख्या - ८ सर्प, - ९ बाणें, - १० धैर्य, - ११ नाकास.

कोपावेशें झाले— कृत्यांनींचे समुद्रसे— उन्नते. २६

"सर्वांसि द्रोण म्हणे, 'भूपें बहु भीमसेन कोपविला;
बहु यत्न यासि अरिच्या मथनीं— गिरिच्या जसा नको पविला.

'दावील भीम विक्रम आजि रणामाजि राम-रायाचा;
रक्षावा स्वपति, समय आत्मा हा साजिरा मरायाचा.' २८

"ऐसें सिद्ध करूनि सुत, कृप, शल्य, जयद्रथादि, बा राया,
गुरु होय पुढें साक्षात् दुर्योधनकाळ भीम वाराया. २९

"भीम गत-व्यथ होउनि, धांवे, तों द्रोण बाणवृष्टि करी;
साहे तो नीस-जलद- वृष्टीस जसा मदांध-दृष्टि करी. ३०

"भीम गुरूरीं शर-तति, न्हाया वीरांत नव्ययशा, हाणी;
मूर्छित करी, न होऊं दे ती तज्जीवन-व्यय शाहाणी. ३१

"द्रोणि, सुयोधन उठले माराया आपणा—असें पाहे;
वाहे गदा, त्यजुनि रथ; राहे निर्भय उभा, पुढें आहे. ३२

"जल जलद जसा वर्षे— शस्त्रें द्रोणादि वीर सर्व तसा;—
त्यानें साहत होता सत्वाचा सिंधु पार्थ—पर्वतसा. ३३

"तेव्हां फार रववळले सौभद्र, द्रौपदेय, हे, राया.
समर असोचि; न शकलों आम्ही त्यानें मुहूर्त हेराया! ३४

"भीम-सखें, नीळ-नृपें,—जैसा शक्रें स्व-शत्रु नमुचि, तसा—
गुरु-सुत गांठुनि केला कलह द्वि;-होय प्रकार संमुचितसा. ३५

---

१ मेघवृष्टीस,- २ मदेंकरून अंधझालीआहे दृष्टि ज्याची,- ३ गुरु-उरीं,- ४ बाणावळी,- ५ नवीनयशा,- ६ मेघ,- ७ पहाया,- ८ दैत्यविशेष,- ९ अतिउचित.

"गुरुपुत्र शरें भेदी, जन्हि नीळ नृपोर अश्म लक्षण, हो;
करुनि अचेतन पाडी त्या धैर्यनिधीस करेमळ क्षण, हो. ३६
"धांवे मार्कंडेया- प्रति जैसा काय कोपला शमन,–
तैसा गुरुपुत्राप्रति, विकल करायासि तो पलाश मन. ३७
"भस्मचि करी घटोत्कच कटकीं हाणूनियां परा शर, हो.
गुरुपुत्र म्हणे; बहुधा या कर्मे बहुसखी पराशर हो. ३८
"दुर्जय जाणुनि योजी मोहाया गुरुसुतास मायेतें;–
मोहायाचें तांडव ज्या-गरळाच्या उनासमा-येतें. ३९
"द्रोण, द्रौणि, सुयोधन, शल्य,-असे मुख्य जे बळामधिले,
ते पाहिले बलांनीं प्रत्यक्ष घटोत्कचें रणीं वधिले. ४०
"म्याळीं सकळें हि बलें; तडक पळालीं, न राहिलीं पळ तीं;–
नगशिखरस्खलदुपलां- सम, राया, म्यां चि पाहिलीं पळतीं.
"हाका मारित होतों मी कीं, हे राक्षसीतनय माया;
न यमा या कर्मे वश व्हा; रा चें कांडें हा अनय माया. ४२
"भीष्माहि ऐसेंच म्हणे, परि जोडी एकही न भरप कर.
आज्ञा अवश्य म्हणतें जन्हि केवळ शून्यही नभ टपकर. ४३
"माझ्या, भीष्माच्याही, कोणी ही जन न वारणा परिसे;
जय हर्षे, सघटोत्कच, पांडव-भट सर्व गर्जले हरिसे. ४४
"सांगों काय, परिभवें नृप भीष्माजवळ जें चरफडे तें?

---

१ नृप-उर, -२ पाषाणासारिखें, -३ मूर्छा, -४ यम, -५ नग-शिखर-स्खलत् उपल-सम- पर्वतशिखरापासून सुटलेल्या पाषाणासारिखीं, -६ क- अंड- ब्रम्हांड, -७ योधश्रेष्ठ.

वाटे-अहिच्या गेला लाउनि रद दिव्यरेवेन्चर फडेतें. ४५
"देउनि उत्साहातें भगदत्ता-शत्रु-जन-यमा-राया,
सेनापति शांतनव प्रेषी तो भीम-तनय माराया. ४६
"त्या भगदत्त-नृपासीं प्रथम तुमुल,सुचिर समर भीम करी;
भंगी दशार्ण-पतिच्या प्रबलाहि गजा तदीय भीम-करी.४७
"नाग मथावे त्या भग- दत्ताच्या अन्य कां न नागानें ?—
व्हावेंचि,जिंकुनि इतर अंग,हरिच्या धन्य काननोगानें. ४८
"पाहुनि भगदत्त-शर- द्विप-मर्दित-सैन्य-दैन्य नयनांहीं,
धांवे घटोत्कच, जया मरणापासूनि लेश भय नाहीं. ४९
"भगदत्तासीं भांडे- शक्रासीं मेघनादसा-राया;-
किंवा प्रवर्तला त्या द्वैता अद्वैतवाद साराया. ५०
"किंबहुना,-भगदत्तें अत्युग्रा शक्ति सोडिली होती,
गगनांत उडोनि,धरुनि, इक्षुपरि स्पष्ट मोडिली,हो,ती. ५१
"तों'साधु,साधु!'-ऐसें वदले सुर,नर, म्हणोनि तो खवळे;
अहितांकडे-दुखविला दर्वीकरसा-धरूनि शरच, चळे. ५२
"सौभद्र-प्रमुखांतें ताडी,मूर्छित करी; विशोकास
विरथ करूनि,म्हणे,रे, बळकट बांधीं, पृथा-शिशो,कास. ५३
"वरिचेवरि झेलुनि घे गुरुच्या जो,भीमसेन,सुरवं-निगदा,
शीघ्र रथावरुनि उडी टाकी, कचळूनि शक्ति-सं-रवनि गदा. ५४

---

१दंत,-२गरुड,-३भयंकरगज,-४ गज,-५ वृक्ष,-६ कानन-अग-इंद्राच्या नंदन वनांतील वृक्षानें-कल्पतरूनें,-७ भगदत्ताच्याबाणांनीं आणि गजानेंमर्दिलेल्या सैन्याचें,-८ रावणपुत्र-इंद्रजित-९उंसासारिखा,-१० शत्रूकडे,-११ सर्पसा,-१२ सुरवापदेश वाक्यास.-१३ शक्तीनें उत्तमरवाण.

“झालों बहु इतुक्यांतचि येतां देखोनि कृष्णसारथितें[1];
न कृचे पळणें—पाहुनि हरि विसरति जेविं कृष्णसार,थितें.
“प्रथम इरावान्मरण[2] झाल्याला भीमसेन आयकवी;
कृत-शोक वसिष्ठासहि दुःसह,न म्हणेल कोण‘हाय’कवी? ५६
“कृत-शोक-ज्वलनाची[3] प्रथमचि हृदयासि लागली आहे;
पार्थ म्हणे,‘देवा,हे गरल-गुरु-गृहांत वागली आहे!’ ५७
‘गमला हित, ओगरितां कांजी,मधु,सूद[4] नाकपाळाला.—
अर्थ तसा आलाहे कां,जी मधुसूदना! कृपाळाला? ५८
‘धिक् क्षत्र-वृत्ति! ते मज, युद्ध न करितां,अशक्त म्हणतिल कीं.
हाक,हरी;येऊं दे अरि दारांच्या अनित्यपण तिलकीं.’ ५९
“गरुडाहुनि पार्थाचा बहुत पळवि लोकनाथ रथ,राया.
लागे भयें कुरूंचें करुनि बल विलोकना थरथराया. ६०
“कृप,भगदत्त,सुशर्मा, देवव्रत,विजय-वाह-वेगातें
रोधिति,परि त्यांचें बल निज-रक्त-नदांत वाहवे,गा,तें. ६१
“द्रोणासह पुत्र तुझे भीमावरि धांवले मथायाला;
व्यूढोरस्कादिक नव मेले,मन कांपतें कथायाला! ६२
“गुरुतें वारुनि,नेले एकैक-शरें चि ते नव लयातें.
भीमसम भीम-विक्रम हा किति! मानूं नको नवल यातें. ६३
“झाला अंबष्ठ विरथ अतिरथ-सौभद्र-शस्त्र-हृत-वर्मा;

१ अर्जुनास,-२ इरावानाचें मरण,-३ ज्वाला,-४ स्वयंपाकी,-५ इंद्रास,-६ शत्रुस्त्रियांच्या,-७ भीष्म,-८ अर्जुनाच्याघोड्यांच्यावेगास,-९ महादेवासारिखा,-१० भयंकरपराक्रमज्याचा,-११ महारथी अभिमन्यूच्या शस्त्रानें हरण केलें कवचज्याचें.

त्यासि स्वरथीं वाहुनि पळवी अति संक्रांत कृतवर्मा. ६४
"भीष्मादिकांसि, वारुनि, विजय तदस्त्रांसि तत्तदस्त्रांनीं,
झांकी शर-पटलांनीं— आढ्य जसा दुर्गतासि वस्त्रांनीं. ६५
"बहु मानवले अष्टम- दिवसीं झाल्या रणासि शूर, सांजे[1];
वीररसा बहु भुलले, सेवित होते तदन्य शूरसां जे. ६६
"तात सुता, सुत ताता, भ्राता भ्रात्यास, मित्र मित्रास,
मारित होते, राया, होउनि विकरुण[2], विखेद[3], वित्रास. ६७
"न दिसे, न कळे स्व पर,—ध्वांत[4] परम गाढ वाढवी रजनी;
केला अवहार, नृपा, होय क्षत-ताप बाढ वीर-जनीं." ६८



## अध्याय १०

### नवमदिनयुद्ध.

"राजा कर्णासि म्हणे, 'कृप, शल्य, द्रोण, भीष्म, हे आर्य
पांडुसुतांतें रक्षिति, कैसें सिद्धीस पावतें कार्य ?  १
'सांगेल कवण मज तुज यांचुनि या संकटीं उपाय सखा ?
मित्रमतिच हित करिती, मायचि म्हणती बळें सुपायस खा.' २
"कर्ण म्हणे,'मी करितों कार्य तुझें, शक्य हें न अन्यास;
परि भीष्माकरवीं त्यां करवावा आजि शस्त्रसंन्यास[5]. ३

---

१ सायंकाळीं, - २ निर्दय, - ३ खेदरहित, - ४ अंधकार, - ५ शस्त्रत्याग.

'[१]त्यासि तीर्थ-यात्रा सांगा-इन्द्रासि तीच उचिता कीं ?
रुचि अमृतीं सापडतां, रसिकीं घ्यावी कशास रुचि ताकीं? ४
"अस्त्रन्यास करावा भीष्में, कीं या बळांत न वसावा,
मग कार्य-सिद्धि माझ्या ज्ञातीं-नलगेचि देव नवसावा.' ५
"हें कर्ण-मत परमहित ऐसें आलें मनासि राज्याचा;
शीघ्र रथावरि बैसुनि, रात्रौ, शिबिरासि जाय आज्याच्या. ६
"वंदी पितामहा कुरु- प-जयंताचा पिता महादेवा
सर्वज्ञा सन्मान्या वरदा, किंवा पितामहा देवा. ७
"कर जोडुनि दुर्योधन वदला, 'अजि भरत-कुल-तिलक राया,
भुलल्या मागें विजय- श्री-दृष्टि, पुढेंहि भुलतिल कराया. ८
'आम्हां या पायांचा आश्रय-देवांसि जेविं शक्राचा;
साक्षात्प्रताप तुमचा आश्रित-शिव जेविं विष्णु-चक्राचा. ९
'पांडव किति? जिंकावे आम्हीं तुमच्या बळेंचि सुर सगळे!
युष्मद्यशासि लाजे विधु,[४] ज्यापासूनि अमृत सुरस गळे. १०
'तरि जय दुर्लभ आम्हां! झाले युद्धासि आठ वासेर, हो.
हें नवल, मराल म्हणे तृड्विकळ-शिशूंसि, "आवरा सर, हो." ११
'ऐसें कां, जी, करितां? शत्रु-वधें जोडिलें स्वयश खरवा.
खाइल अहितांसि; मना- आंतूनि म्हणा, "असंशय, शरा, खा." १२
'बहु-वीर-क्षय झाला, आलें आठां दिसांत न यश मला,

---

१ दुर्योधन. - २ इंद्र. - ३ ब्रह्मदेवास. - ४ चंद्र. - ५ दिवस. - ६ हंस. - ७ तृट्विकळ- तृषेनें विकळ झालेल्या.

शमले मद्बंधु बहु; न एकहि माद्री-पृथा-तनय शमला. १३
'स्वीकृत कार्य मनावरि घ्या, प्रभुजी; पांडुवत्स मारा, हो.-
कीर्ति जसी रामाची- लोकीं तुमची हि तत्समा राहो. १४
'जरि माझ्या द्वेषें,-कीं, केवळ मद्भाग्य मंद या करितां,-
मद्रीतें रक्षितसां,-कीं सदयपणें तुम्ही दया करितां,-१५
'तरि कर्णाला आज्ञा द्या, तो त्या पांडवांसि मारिल;
मारील स्वहि न तदिषु- हुनि अधिक प्राणि-ज्ञात सारील. १६
"दुर्योधनोक्त परिस्फानि, जिरवी शांतनव रोषवेगातें.
जें असह्नत्व, रवळमत,- पळही सज्जना न पोषवे, गा, तें. १७
"भीष्म म्हणे, 'रे राया, लागति वाग्बाण काळजाला कीं?
समरीं श्रम,-आतां ही तुज वदतां फार काळ झाला कीं? १८
'वाच्यावाच्य न जाणसि, काय म्हणावें तुला? असोंदे हें.
दिधलें त्वत्कार्यार्थ स्वप्राण, कबंधसे असो देहें. १९
'पर्याप्त तें निदर्शन- मोहुनि सर्वांसि मोहनें अस्त्रें,
वस्त्रें विराट-नगरीं हिसकुनि नेलीं, न हातिंचीं शस्त्रें. २०
'पर्याप्त तें निदर्शन-जगदीश्वर जेविं नक्र-मुक्त करी-
पळतां कर्ण, विजय स्मर- गायक-बद्धा तुला विमुक्त करी. २१
'कोण तयांतें मारिल, ज्यांचें जगदीश तो परम कवच,-
ज्यांचें प्रभुला बहुमत- जेसें वृद्धासि चरम-तोक-वच? २२

---

१ मद्रूपारिलें लक्ष,-२ वाच्य-अवाच्य- बोलावें काय न बोलावें काय,- ३ पूर्ण,- ४ उद्दाहरण,-५ गंधर्वांनीं बांधलेल्या ऐशा,- ६ शेवटल्या मुलाचें

"जरि नारदादि मुनिनीं कथिलें, तूं जाणसी परि न मोहें;
तरि जिंकितासि त्यांतें, धरितासि मनीं,मुरवीं,जरि नमो हें. २३
"हे* पुरुष-वैर केलें, तैसें युद्ध स्वयेंचि करजा, गा.
माये-च्याभावाचा होता आतां चि कां न कर जागा? २४
'आम्ही करूं,शिखंडी वर्जुनि,पांचाळ-सोमकांतातें;
द्रववूं यशः शशीनें सत्हृदयजन-हृदय-सोमकांतातें. २५
'पांचाळ-सोमकांतें भाजीन प्रलय-सूर्यसम, राजा;
करिन तसा,गातिल कवि- वर,यावच्चंद्रसूर्य,समरा ज्या. २६
'वधिन तयां मी,कीं मज वधितिल ते;- काय आंग राखावें?
अमृत मिळालें त्यागुनि, सजें दाटूनि कां गरा खावें? २७
'भगवदितर सकळहि जन म्हणतिल,'तूं धन्य,भीष्म-चापलते!'
नीज स्मरवें. आहें मी तों करितिल काय,करुनि चापल, ते?२८
'श्रुत आहे आम्हां जो स्व-करें छेदी स्व-मास शिबिराजा;
निववूं तद्दृष्टि उद्यां, श्रमलासि निजावयास शिबिरा जा. २९
"हर्षे अभयोक्त्यर्थी,- अधन जसा मूर्त-कल्प-वल्यंकीं;
वंदुनि पितामहातें, येउनि शिबिरीं निजे सपर्यंकीं. ३०
"प्रातः काळींच उठे राजा,राजांसि शीघ्र आणवुनी -
सर्व जपोनि नदी-सुत रक्षा-ऐसें तयांसि जाणवुनी. ३१
"दुःशासनासि सांगे, 'मज कळलें इंगितें असें आजी,

१ शकुनिमामा,-२ यशरूपचंद्रानें,-३ कविजनाच्यात्हृदयरूपसोमकांतास,-४ विषास,-५ कल्प-वल्ली-अंकीं. + मंचकीं,

*. हो पुरुष- वैरकेलें तैसें युद्ध स्वयेंच कर जा,गा. असाहि एकपाठआहे.

शांतनव अर्जुनासीं करिल मनातूनि निश्चयें ओजी. ३२
"शल्य-रूप-द्रोण-शकुनि- सह सर्व तुम्ही जपोनि, सेनोनीं
रक्षा. करिल अरि-लय प्रलय-तरणिसा तपोनि सेनोनी. ३३
'कुरु-सिंह अरि-गजांतें नेनो, ह्मणूनि शर-नख-पवि, लया.
परि काय उगा बसतां? क्षुद्रमति शिखंडि-वृकें न खपविल या?
"असि आज्ञा करुनि निघे नृप; कांपे बहुत मेदिनी; नव मी
आश्चर्य काय सांगों? विश्व-प्रलयचि गमे दिनीं नवमीं! ३५
"विजय ह्मणे, 'ने धृष्ट- द्युम्ना भीष्मापुढें शिखंडीतें,
तो ही विगतोत्साह- प्रेक्षूनि जैसा फणी शिखंडीतें. ३६
'रक्षीन शिखंडीतें; याच्या प्राणासि किमपि भय नाहीं.
जें कांहीं करिन कुतुक तें देखावें दुरूनि नयनाहीं.' ३७
"आह्मांपुढें महात्मा भीष्म, वृकोदर तयांपुढें चाले;
झाले उत्पात बहुत, तेव्हां चळचळ वसुंधरा हाले! ३८
"व्यूह प्रथमचि मथिला अर्जुन-पुत्रें, जसा वनेद वातें;-
न शके तया कुयोधन- बळ वाराया-जसें वन दवातें. ३९
"कुरुपति अलंबुषाला अभिमन्यु-वधार्थ पाठवी, राजा:-
कुजना कुनीति तैशा, माया बहुसाल पाठ वीरा ज्या. ४०
"तो मायावी राक्षस सौभद्रासीं करी महा समर.-
त्यजुनि रथ, पळुनि जातां, त्यासि ह्मणति साधु ही सहास-मर.

---

१ युद्ध, २ सैन्यांनीं, ३ सेनापति, ४ वज्र, ५ लांडगा, ६ सर्प, ७ मौरास, ८ पृथ्वी, ९ वन-द-उदक देणारा-मेघ, १० वायूनें, ११ अरण्य, १२ वणव्यास, १३ हास्यसहित.

"नरलोक हा द्विफाल्गुन- ऐसें तेव्हां जनास वाटविलें.
तें वोहिनी-शात विजय- पुत्रें-भीष्में नसें चि- आटविलें. ४२
"कोपविला भीष्म, नृपा, करुनि बहुत कटक-मथन पणतुंडें;
वेढिति सौभद्रातें कौरव, बोलोनि हनन-पण तुंडें. ४३
"कार्ष्णि म्हणे, 'वायुपुढें जरि काय टिकत असेल कोंडा, या.
होइल दवासि तृण, तरि ह्माल क्षम मज तुम्हीहि कोंडाया.' ४४
"कुरु शस्त्रजाळ पसरिति,- अवकाशा न उरवी नभाच्या तें;
विजयासि तेथ आणी प्रभु, कीं परिभव घडो न भाच्यातें.
"काय कथूं गांठि विजय घाली सहसा पितामहासीं तें!
झाले पुढें तईं बहु, नग्न करुनि रणांहुता महासीतें. ४६
"कृप-भीष्म-प्रमुख-स्थित पार्थातें पंचवीस शर हाणी;-
करिता झाला ज्याच्या न यशाची, करुनि युद्ध, हर हाणी.
"पार्थप्रियकर सात्यकि तुमुल कृपासीं मुहूर्त समर करी
अन्योन्य-भंग-कामुक ते- क्रोध-मदांध जेविं अमर-करी. ४८
"मामाचा कैवारी अश्वत्थामा लयासि नेंने या;
मर्मीं खर शर हाणी, ह्माणी क्षतजें सचैल शैनेया. ४९
"होते पुष्पित-किंशुक- तर्वनुकृति करित ते शरीरांनीं
असुनिरपेक्ष झगडले घटिकाभरि, जेविं केसरी रानीं. ५०
"गुरुकृत विधूंन, सात्यकि- सायक-निकरहि गमेन राहून

---

१ दोन आहेत अर्जुन ज्यांत, २ सैन्य नदीहि; ३ मुखानें, ४ अभिमन्यु, ५ शक्तिमान्, ६ महा-असि- उनमतलवारीस, ७ शिव, ८ हत्ती, ९ फुललेल्या किंशुक तरूंची अनुकृति- अनुकरण, १० प्राणांविषयीं निरिच्छ ऐसे, ११ विधु- ऊन- चंद्रापेक्षां उणा, १२ राहु- ऊन- राहूपेक्षां उणा.

राहून नभींहि, तदा दिनमणिहि[1] बहु भ्रमे नराहून.[2] ५१

"तों द्रोण ही म्हणे कीं, 'जें पुत्रीं सुख, न नंदनवनीं तें;

सुन सर्व-मतः सुखींच्या एकचि पोषी न नंद नवनीतें.' ५२

"नेतां अरिच्या स्यंदेन[3] नंदन-रक्षार्थ आडवा तातें,

ये विजय–जेविं दीपक रक्षाया पदर आड वातातें[4]. ५३

"गुरु शिष्य तेविं करिति, प्राकृत सहजारि[×] जेविं कलहातें.

तें त्वां केलें, होतें प्रेम न विधिच्याहि जें विकल हातें! ५४

"गुरुभक्तोत्तमहि विजय हाणित होता गुरूसि निकरानें;

शिष्यासि शिष्य-वत्सल गुरुहि प्राणघ्न-बाण-निकरानें[5]. ५५

"तों धांविला सुशर्मा, राया, आला धनंजयावरि तो;

तेव्हां वदले सुर कीं, 'सकुळ[6] शलभ हा धनंजया[7] वरितो!' ५६

"गांठुनि करी सुशर्मा शर-पटलें जिष्णुच्या रथा पिहित[8];

तो यद्यपि अहित[9], गमे विजया विजयोद्यंता[10] तथापि हित[11]. ५७

"भस्मचि करी धनंजय लीलेनें तीं समस्त शर-पटलें;

दिसतें काळें नभ, हें धुरकटलें, तें धवांचि करपटलें! ५८

"होय पतंगचि, न करी, झडुनि हटानें, विपन्न दीपातें;—

तेसें सुशर्म-बल तें आपणचि बुडे विपन्नदीपातें[12]. ५९

"विजय उडवितचि होता वातास्त्रें करुनि, जेविं तृण सकलें;

परि तें त्रिगर्त-कटक- व्यसन द्रोणा श्रयें, नृपा, चुकलें. ६०

---

१ सूर्य, -२ नरापेक्षां, -३ रथ, -४ वायूस, -५ समूहानें, -६ टोळ, -७ अग्नीस, -८ आच्छादित, -९ शत्रु, -१० विजय-उद्यत- विजयाविषयीं तत्पर, -११ मित्र, -१२ विपत्-नदी-पात- विपत्तिरूप नदींत पडून, - × सहज-अरि-स्वभावतः शत्रु.

"कुरुगुरुनें शैलास्त्रें नसतें वातास्त्र वारिलें जरि तें,
करितेंच रितें कुरु-बल, हरितें, एकाहि नुरवितें अरितें. ६१

"अस्त्र-निवारण होतां, लागाचे जों अराति हरिखोया,
शिरले त्रिगर्त-कटकीं विजय-शर-जसे गजांत हरि खाया. ६२

"विजयातें कोंडाया भट झटले बहु, झटे सुयोधन ही;—
मारा; मरा; पुढें व्हा;—म्हणत्यास म्हणेल कां सुयोध नहीं? ६३

"भगदत्तें भीमावरि करिकटकें लोटिलीं बहुत, राजा.—
वर्चकावें प्रलय-जलद-पटलेंहि भयंकरा बहुतरा ज्या. ६४

"केलें प्रयाण धर्मा-प्रति भीष्में धार्तराष्ट्र-बल-सहितें;
तेव्हां जें वीरांचें रूप, न मिरविति सपुष्प पळसहि तें. ६५

"शिरला भगदत्ताच्या करि-कटकीं भीम सिंहसा; गमला
तो वज्री, ते गज नग;— तो तार्क्ष्यचि, ते समस्त नाग मला. ६६

"बहु गज-विदारण करी भीम—जसें वासव नग-दारण, गा.
मागों नेदि स्पृष्टा कोण्हा जीवास वनें गदा रणागी. ६७

"गज-रक्त-दिग्ध शोभे—जेविं गणाधिप विलिप्त-सिंदूरें;
स्पष्ट फुटावें, पाहुनि त्यासि, अमृत-रस-मयेंहि इंदूरें. ६८

"क्षत-हत-शेष द्रुत गज ते, अभिचार प्रयोगसे, फिरले;
नाशिति कुरुसेनेतें—तनुतें गद शेवटीं जसे शिरले. ६९

निववी कुरूंसि, केलें गांगेयें युद्ध सोमकां सह जें;

---

१ पर्वतास्त्रें,-२ शत्रु,-३ आनंदायास,-४ म्यावें,-५ अत्यंत,-६ इंद्र,-७ पर्वत,-८ गरुड,-९ सर्प,-१० इंद्र,-११ पर्वतांचें विदारण,-१२ शिवलेल्या,-१३ उदक,-१४ युद्धांतील,-१५ लिप्त,-१६ इंदु-उर-चंद्राच्या उरानें,-१७ हिंसाकर्म,-१८ शरीरास,-१९ रोग,-२० भीष्मानें.

निववील न प्रसादें कुमुदांतें शुद्ध सोमे कां सहजें ? ७०
"स्पर्श शिखंडीतेंचि, स्त्री पूर्व म्हणुनि, करी न रोपानें;
भंगी इतरां सकळां— कल्पांतीं रुद्र जेविं कोपानें. ७१
"द्रुपद-विराट-वृकोदर- सौभद्र-द्रौपदेय-धर्मांचें
भीष्म बल न चालों दे,— जैसा प्रारब्ध-भोग कर्मांचें. ७२
"नकुल-सहदेव-सात्यकि- धृष्टद्युम्नादि वीर दिन दीप
झाले! घटजमुनिपुढें न टिके घटिकार्ध थोरही नदीप. ७३
रक्त-नदींत सजीवहि हय, गज,- न भेत वाहवी, राजा.
त्यां तो किति वर्णावा, बहु-वंद्य के श्वेत-वाह वीरा ज्या! ७४
"देव म्हणे, 'हा शतशः क्षतजांचे पूर वाहविल; यातें
नेसिल, घेसिल चित्तीं तरि, तूंचि श्वेतवाह विलयातें.— ७५
"मजसीं जे रिपु सैनिक, भीष्म-द्रोणादि, युद्ध करितील,
गांडीव-मुक्त सायक त्यां त्यांच्या जीवितासि हरितील." ७६
'सत्य करीं मत्स्य-पुरीं जें हें वदलासि संजया पाशीं,
हिंन सत्य-पाश. दाटुनि बुध अर्पिति शीर्ष-कंज या पाशीं. ७७
"पार्थ म्हणे,' सज्ञानें, सत्तेजें, सत्य लोक-पति तरणी.—
ऐसा कुरुगुरु वधितां, म्हणतिल मज सत्य लोक पतित रणीं. ७८
'हें ही फार कठिण कीं, गुरुवागनधीन शांत न वदावा;
हो कांहीं, हांका हय,-घडत्यासि वधीन; शांतनव दावा. ७९

---

१ चंद्र,- २ बाणानें,- ३ समुद्र,- ४ जीवंतही,- ५ फी,- ६ रक्तांचे,- ७ हितकर,- ८ शिरःकमल,- ९ पातकी.

"ऐकुनि असें प्रभु नदी- सूनुकडे चालवी रथा,राया.-
सम ज्यापुढें न कोण्ही, धरुनि तसी चाल,वीर थाराया. ८०
"भीष्म विजय-रथ झांकुनि, कांपवि पुरुषा परा शरासारें;
अरिदुःसह तेज गुरुसि दावी अर्जुन पराशरासारें. ८१
"भीष्म-शरांचें पार्थ, प्रभु-साधूक्तीस पीतें,पटल हरी.
लाजवि सुधानिधीच्या स्तुति सूक्तिसमुद्र-पीत पट लहरी.
"छेदी देव- नदीच्या दायादाच्या धनुष्य-वल्लीला;
तेणें हरि बहु हर्षे, कीं आदरिली मनुष्यवल्लीला. ८३
"भीष्म प्रभु दुसरें धनु सज्य करी जों न हालवे पोतें,
तच्छेदें स्मरवाहृ ति, मग कां न तुम्ही वहाल येपोतें? ८४
"विच्छिन्न निमेषांतचि करितां दुसरें धनु स्व-नातुं डें,
आशीर्वृष्टि करुनि,करी- हरिसा-गंगात्मजनु स्वनें तुंडें. ८५
"गर्जोनि म्हणे,'वत्सा विजया वीरा,भला भला! बा,हूं;
बाहूंस तुझ्या दृष्टि न लागो,-भलत्यासि काय मी बोहूं!'
"ऐसें वदोनि,तिसरें सज्य करुनि चाप,परम करुण पेण,
हाणी इषु मागें इषु;-करि विजयाचें विगर्व तरुणपण.८७
"चुकवि प्रभु,मंडळगति रथ फिरवी,त्वरित घोटक पिटाळी;-
स्तवि,जो छाया-ग्रह त- च्छक्तीचा भरुनि घोट कपि टाळी.८८
"हययानीं परम बळ प्रकट करी प्रभु,-परोपरी चुकवी;-

---

१परमपुरुषजोकृष्णत्यास,-२शर-आसार-शराच्यासततवृष्टीनें,-३पराशरासारिखें,-४ कृष्णाच्याउत्तमवचनास,-५प्राशनकरीत,ऐकत,-६स्तुतीच्याउत्तमभाषणाचासमुद्रपीतांबरधारी कृष्ण,-७गंगेच्या,-८पुत्राच्या,-९पापण्या,-१०कंपातें,-११सिंहासारिखा,-१२गंगापुत्र भीष्म,-१३शब्दनाद,-१४मुखानें,-१५बोलावूं,-१६तथापि,-१७बाण,-१८गर्वरहित,-१९घोडे,-२०राक्षसविशेषजोमारुतीस्आडथाळा लाहोता.

परि न शके टाळाया प्रारब्ध, स्रवो[1]स्रवा जसा स्रकवी. ९
"ब्रम्ह क्षत्तजें न्हाले; ते पुष्पित[2]पर्णवत् जना दिसले;
झाले शल्यार्त मनीं, यत्ध्यानें न टिकती अनादि सले. १०
"भीष्म ग्रीष्म-तरणिसा, अर्जुन हेमंत-तरणिसा गमला;
देव म्हणे, 'बहु आला वृद्धाहुनि जिष्णु[3]चाचि राग मला. ११
'हा शूर, "दूर, ओ, सर"-म्हणणार महा-प्रभा-वहा रविला!-
हार विलासि जनेंसा- येणें कैसा प्रभाव हारविला? १२
' झाला धीर परि परि- म्लान सखा-जाति-पुष्प-गुच्छ[4] कसा!
तुच्छ कसा हा प्रचेया[5]- चिरडिल भलता अहींद्र-पुच्छ कसा?
'हा पांडवांसि भस्मचि करिल, उपेक्षा करूं नये याची.
पदरासि अकीर्ति श्रित- स्फुटद्[6] नवनपथ करून येयाची[7]. १४
"आणुनि मनीं असें, ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास
भीष्म वधाया धांवे हरि, हस्तें कवळुनि प्रतोदास. १५
"देव, रथातें सोडुनि, धांवे देवापगा[8]-विलापार्थ;
कीं दुस्तरारि-सागरिं[9] न बुडो कासोस लाविला पार्थ. १६
"पार्थाप्रति प्रयत्नें तो बळकारुण्य-सिंधु राखाया
क्रोधें गर्जत धांवे- सिंह जसा मत्तसिंधुरा[10] खाया. १७
'एह्येहि[*], देवदेव! श्रीकृष्णा! नमोस्तुते!'- असें बोले;
आले गल्लु[11] प्रांज्य[12]- प्रेमाश्रुभरें करूनियां, डोले. १८

---

१ स्रव- अस्रव, _२ फुललेल्या पळसासारिखे,_३ महाप्रभा वाहणाऱ्या,_४ घोंस, तुरा,_५ ह्रास,_६ श्रित- स्फुटत्- अनवम- पथ- आश्रित मित्रांचें अरक्षणपथ,_७ याच्याची,_८ गंगेच्याशो कार्थ,_ ९ दुस्तर- अरि- सागरीं,_१० मत्त हत्तीस,_११ गाल,_१२ पुष्कळ.

* एहि एहि, देवदेव श्रीकृष्णा! ते नमः अस्तु!- हे देवदेवा श्रीकृष्णा! यावें यावें! तुजकारणें नमस्कार असो!

"भीष्म म्हणे,'त्वंद्धस्तें व्हाया समरांत शांत, नच सा जो
होता करीत, तो हा जेविं हरिहतेभ-शांत नच साजो. ९९
'जरि मारिशील, मज गति- लाभ, तुजहि कीर्ति लाभ गुरु-तर तो;
विश्वगुरो! शकुनहीं, तारुनि शरणागतासि, गुरु तरतो. १००
'तूं हरिसा हरि, साची हरिणी क्रूरसिंधु, मीहि पांडससा;
पांडःसंसाध्वस होअरि-हरिचा पावेल काय पाड ससा? १०१
'ब्रम्हांड भस्म व्हावें ज्याच्या दर-रक्त-चक्षुच्या पातें,
तो तूं आंगें मारूं पाहसि मज, दावुनि प्रतापातें! १०२
'झालों धन्य त्रिजगीं! भांस पळें शकुनांस मारकसा.—
त्या प्रभुनें तो केला भस्म स्वातिक्रमेच्छु मार कसा? १०३
"थांबुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूंनीं;
मग दृढ चरणींच मिठी घाली, पहिलीच रीति पाहूनी. १०४
"दूर उसळला होता कोपावेशें मुकुंद कंदुकसा;
राहे उभा प्रभु, गमे इभसा;-धृतचरण भक्त अंदुकसा. १०५
"पार्थ म्हणे,'श्रीधर्मा- वरि धरितिल जे असिप्रति ज्ञाती,
मरतील; त्यजसी कां आयुध न धरिन-असि प्रतिज्ञा ती?
'मारिन भीष्मातें मीं,-इतरांतेंही, भवद्दयाधारें;
बा! त्वत्प्रसाद ज्यावरि, केवळ मेरुग्रहीं तया धारें! १०७
'लोक तुज मृषावादी ऐसें न म्हणोत, सत्य-संध-पते;

१त्वत्-हस्तें, २ हरि-हत-इभ-सिंहानें मारिलेला गज, ३सिंहसा, ४गंगा, ५हरिणाशिशु, ६संभय
७थोडक्याआरक्तडोळ्यांच्या, ८ वाट, ९पळभर, १०मारेकऱ्यासारिखा. यमासारिखा; ११महादेवानें,
१२आपलाअतिक्रमकरूंइच्छिणारा, १३मदन, १४चेंडूसारिखा, १५शंखवळेसारिखा, १६भवत् दया-आधारें,
१७मेरु-अग्र, १८लघु, १९सत्य प्रतिज्ञाज्यांची अशांतीलश्रेष्ठा, * अर्जुन.

मरतिल तव दृक्पातें भीष्मद्रोणादि सर्व अंधप[1] ते! १०८
"कुरु-कुंजरासि[2] गेला होता यदु-सिंह तो खरा खाया,
परते[3] पेर तेथूनि, प्राण-प्रिय-मित्र-तोरव रारवाया. १०९
"कृष्ण स्वरथीं चढतां, समर-चमत्कार मग नवा तातें
दाखविला,-वाहों दे न शर-व्रज[4]-पूर्ण-गगन वातातें. ११०
"भीष्म-शर-व्रज दावचि, पांडव-भट-निकर तो गमे घास;
क्षण सोसवे न कोणा- सहि-जैसा वायुयोग मेघास. १११
"तों पांच, सात, हय, गज, हाणुनि एकाचि सायका[5], मारी;
वदलीं बहु कटकें कीं,-करितो कल्पांत काय कामारी[6]? ११२
"कुंती-सुत, माद्री-सुत, कृष्णा-कृष्णानुजा-सुत[7], भ्रमले.
भ्रम लेखांसहि[8] पडला, गत-चेतनसेचि सर्वही गमले. ११३
"जेविं महावात करी अभ्रांचा नलवितां पळ विसकट,
त्वत्तात-शर-व्रात, ध्वंसुनि सर्वांसही, पळवि सकट[9]. ११४
"भीष्मास पहायाही त्या समयीं एकही न पर[10] परते.
जे मदमत्त मतंगज, हगले-मदसेकहीन-परपर ते! ११५
"बहु वधिले; उरले जे, ते केले बाहुजप[10] पराभूत.
पाहों शकले न-जसे श्री-नर-हरि-मंत्र-जप-परा भूत. ११६
"तों मावळला दिनकर[11], होय बहु प्राप्त साध्वस[12]; मग तिहीं
केला अवहार-परि- श्रांतांहीं, लंघिताध्व-सम-गतिंहीं[13]. ११७

---

१ अंधाचें (धृतराष्ट्राचें) रक्षणकरणारे, २ कुरुरूपहस्तीस, ३ परंतु, ४ समुदाय, ५ बाणास, ६ महादेवा ७ द्रौपदी-सुभद्रा-तनुज, ८ देवांसहि, ९ शत्रु, १० क्षत्रियाधिप, ११ सूर्य, १२ भीति, १३ लंघित-अध्व-सम-गति - लंघिला मार्ग ज्यांहीं त्या समान गति ज्यांची.

"आम्ही गाजत,वाजत, गेलों शिबिरासि विजय साधूनी;
स्तविला भीष्म बहु - जसा ध्वस्तासुरसैन्य विजय साधूनीं. ११८



## अध्याय ११

### दशमदिनयुद्ध

"रात्रौ राजा धर्म व्याकुळ होउनि असें म्हणे हरिला :—
'धरिला राज्य मनोरथ म्यां,- मूढें,- न वनवास आदरिला.१
'मूर्खें म्यां चि बुडविले संबंधी, बंधु, आप्त, शोकांत;
अयशःपात्र सुयोधन- आधीं तद्बंधु मी हि लोकांत. २
'दे आज्ञा जाऊं दे आदरिला हा कशास्तव निकामी?
राज्यायोग्यचि, केवळ तप मात्र करावया बहु निका मी. ३
'भीम-पराक्रम-भीष्म- प्रभुच्या वदनाकडे पहावेना;—
हरिणा जसें हरिपुढें- आम्हांसि तयापुढें रहावेना. ४
'. जिंकाया शक्य यमहि, शक्रहि, वरुणहि, कुबेरहि, रणांत;
परि हा अशक्य! आम्ही होतों खद्योत, तदिषुकिरणांत!५
'म्यां या प्रभुसीं केला मतिदौर्बल्यें करूनि संगर हा;
सांगावें होतें त्वां कीं, साधूंचा धरूनि संग, रहा. ६
'आतां तरि, परमात्मा देवा! तूं स्वहित-सार सांग मला;

---

१ चांगला,-२ भयंकर पराक्रम ज्याचा,-३ तत्-इषु- किरण- त्याच्या बाणरूप कि रणांत.

शरणागतां तुझा उप- देश-जसा सूर्य सारसां-गमला.' ७
"देव म्हणे,'राया, तूं दादुनि धरितोसि कां विषादास?
ध्यावा श्री-कंगचा, कीं गरुडाचा तरही विषा दास? ८
'विजयी-विष्णु-भुज तसे- ध्याते करितील काम हें भारी;
समरीं हारीप्रति, हट- सोडुनि, वरितील कां महेभारी? ९
'कीं, या जनास म्हण-'हूं'- कैसा करितों त्वदर्थ समर, पहा.
तो भीष्म वृत्र भासो; संपादुनि सद्यशासि, अमरेप हा. १०
'मत्संकल्प असा कीं, साधुनि द्यावीच सर्व भू पार्थी.—
आम्ही प्रजा तुझ्या, बा; साधूं, वेंचूनि सर्व, भूपार्थीं. ११
'जसि अर्जुनें करावी त्वदंशता, बा, तसीच हे मद्दि म्यां;
जरि साध्य साधु करितिल, पावतिल तरीच बाहु हे मद्दिम्या.
'त्वद्धित, मद्धित तें; जें त्वद्दरि, मद्दरि तेंचि; अन्यथा न मनीं.
अन्य प्रेम न माझ्या थे, शिशुच्या जेविं अन्यथा न मनीं. १३
'संबंधी, शिष्य, सखा,- अर्जुन; तूं आर्य-रामसा मान्य;
स्वशिर त्वदर्थ कापुनि देइन! हें काय काम सामान्य! १४
'विजय म्हणेल तरि वधिन शस्त्रास्त्रें मी पितामहा तरणी;
होउनि सुयोधनाचा शोकार्त, वरो पिता महासरणी. १५
'कार्याकार्य न समजे, चञ्चला तो वडू; काय सांगावें!
मणिपंजरीं शुका, कीं सुजें, पाळोनि वायसां, गावें? १६

---

१ कमळांस, २ महा-इभ-अरि-सिंह; ३ दंद, ४ आज्ञाधारक, ५ त्वत्-हित-तुझेमित्र, ६ त्वत्-अरि-तुझेशत्रु, ७ मानूनको, ८ स्वर्गमार्ग;- ९ राजाचामनोरथ.

“धर्म म्हणे, 'जगदीशा, बा, तुझिया साहतिल न वेगा ते
त्वद्यश अनंत गातां, थकले निपुणहि जुने, नवे, गाते[1]. १७
'आहेसि मच्छिरावरि अवितथ-संकल्प[2] तूं परस्वामी[3].
स्वधनानें पावेनचि, वांछीत न गेन जरि परस्वा मी. १८
'तूं असतां मत्पक्षी[4], लाविन मी धाक लोकपाळाला.
भीष्माची काय कथा! पाडिन मी संगरांत काळाला! १९
'युद्ध न करितांचि करीं साह्य; न जावी तया प्रतिज्ञा ती;
माझे जातील तुझ्या दास-द्वेषें तया प्रति ज्ञाती. २०
'शांतनवें समय असा केला कीं, करिन युद्ध कुरुपार्थ[5];-
मंत्र त्वदर्थ; होइल तो विजयद, जेविं धन्विगुरु पार्थ-. २१
'मंत्र पुसाया आम्ही सा[6] जेथ जाऊं, चला उठा.-राया
पार्थूं स्ववधोपाया,-देइल, सुरतरु जसा कुठारा, या.' २२
“देव म्हणे, 'बहु उत्तम. ने. लाजे शक्रसद्म[7] शिबिरा ज्या.'
पावे धर्म नदीजा.- पूर्वीं जैसा कपोत शिबिराजा. २३
“सविनय, विशस्त्र, विकवच, सानुज पांडव पितामहा नमिती.
त्यांहीं गुरु जिंकाया केली ती प्रणति-मिष महा-समिती[8]. २४
“भीष्म प्रहृष्टचित्तें[*], 'वार्ष्णेय[9], स्वागतं[10] तव!'-असेंच
धर्मादिकांप्रति वदे;- सांगा युष्मागमप्रयोजन असेंच. २५

१गाणारे, २सत्यसंकल्प, ३स्वामीश्रेष्ठ-भगवान्. ४मत्-पक्षी-माझ्यापक्षाचा, ५कुरुप जो दुर्योधन त्यासाठीं, ६सहाजण, ७इंद्रमंदिर, ८महा-युद्ध, ९हे कृष्णा, १०स्-आगतं तव-तुझें चांगलें येणें हें संस्कृत भाषेंतील आलेल्याचे आदरसत्काराचें प्रथम प्रसिद्ध भाषण- आपलें येणें फार चांगलें झालें.' *'भीष्मप्रसन्नचित्तें'- असाहि एक पाठ आहे.

'प्रीतिकर कार्य तुमचें, दुष्करहि असो, करीन; सांगा तें.
ये धर्मचि;-पुत्र, स्त्री, कोष, रथ, तुरग, करी न सांगातें.' २६

"धर्म म्हणे, 'झाल अभय, तरि मी अतिमंद तोक विनवीन;-
जो संता संतानक म्हणता मतिमंद तो कवि नवीन. २७

'संत सकल-शरणागत-वत्सल, नाहीं च अधिक शिबि कांहीं.
एक्या सदुक्तिनें जी सुगति घडे, ती न कोटि शिबिकांहीं. २८

'गंभीरता न मिरवू साधुजना माजि नावे उदधीची;
तुमचीच सुकविकरवीं विश्वांत सुकीर्ति गावउ दधीची. २९

'केला, स्वधर्म म्हणउनि, समर-मखारंभ; फळ न परिणामीं.
नव दिन तुम्हां हरीसीं रण करितों, मेळवूनि हरिणां, मी. ३०

'दुस्तर चिंता होतां, ती कर जोडूनि गुरुसचि वदावी.
दावा उपाय-पथ मज-शक्राला जेविं गुरु-सचिव दावी. ३१

'न सुचे कांहींचि मला, स्व-वधोपाय स्वयेंचि सांगावा.
गावें तुम्हांसि कविनीं संतत; एकचि दधीचि कां गावा? ३२

'तुम्हिच म्हणतां-जगावें पार्थिव-वपुपरिस बहु यशोदेहा;
सन्मतिस यशः संग्रह सर्वस्वाधिक,-जसा यशोदे हा. ३३

'होय प्रजा क्षय न बहु, राज्य-जय-प्राप्ति होय, आजोबा,
ऐसा उपाय सांगा; हा शरणागत जगांत साजो, बा.' ३४

"हास्य करूनि भीष्म म्हणे, 'वत्सा! त्वत्हृदयवृत्ति बहु सरला!

---

१ बालक, २ कल्पवृक्ष, ३ नौका, ४ ऋषिविशेष, ज्याणें देवां करितां आपला प्राण दिला.-५ युद्ध रूप यज्ञाचा आरंभ, ६ मृत्तिकेच्या शरीरापेक्षां, ७ यशोदेस, ८ हा कृष्ण, ९ शरण आलेला, १० त्वत्-हृदय-वृत्ति.

सरें[1] लाजो अमृताचें त्वद्धृदया; ताप तवगुणें सरला. ३५

'आम्ही आहों तों तुज केंचा जय संगरा[2]जिरामाजी;
सोसिल इतर कसी, दे मद्[3]िषूं[4]ची भंग रा[5]जि रामा[6] जी? ३६

'करिसिल सर्वांचें, जरि करिसील प्रथम मन्मथन[7], राजा.
कैसे शमविल कोप- प्रभृति[8], न शमवेल मन्मथ[9] नरा ज्या? ३७

'आज्ञा तुम्हांसि दिधली. निःशंक[10] करा प्रहार, पांडव हो.
अस्मद्वधोत्सवीं बहु पुरुहूत[11]सभेंत गीत, तांडव, हो. ३८

'आणा पुढें शिखंडी, म्हणजे पावेन मी उ[12]परमातें.
हाणा दूरुनि विजय- प्रमुख तुम्ही वीर त्या[13]उपर मातें. ३९

' दोघां कृष्णार्जुनि मज तिमरा न त्रिभुवनांत जन हंता.
मानील सत्य हें तो ज्ञाता, ज्याच्या मनांत अनहंता[14]. ४०

'येतांचि पुढें पाहुनि मी त्या स्त्रीपूर्वका मनुष्यातें,
सहसा समरोत्साहा- सह सांडिन सा[15]शुगा धनुष्यातें. ४१

'शस्त्र त्यजिल्या वरि ही बाणांहीं अर्जुनेंचि हाणावें;-
मरिन्च विकळ होइन मी; हें माझें वचन सत्य जाणावें. ४२

'वत्सा विजया! सोडुनि शंका, करिसिल मदीय वचना कीं?
कं[16]च नाकीं स[17]तांच्या तेंविं न हो; हो जसा[18]चि कं[19]च नाकीं. ४३

'धर्मा, कर जोडुनि, जरि पुससी निज-विजय-हेतु-स[20]दुपाया,
तरि हा ऐसा आहे;-बा, नाहीं विदित काय य[21]दुपा या? ४४

१ सरोवर, २ संगर-अजिर-रणांगणांत, ३ मत्-इषु-माझ्याबाणांची, ४ परिभव, ५ समुदाय, ६ परशुरामास, ७ मत्-मथन-माझेंमर्दन, ८ क्रोधापासूनपुढील, ९ मदन, १० शंकारहित, ११ इंद्राच्यासभेंत, १२ निवृत्तीस, १३ त्यानंतर, १४ निरहंकार, १५ स-आशुग-बाणांसहित, १६ केश, १७ निजलेल्यांच्या, १८ बृहस्पतिपुत्र, १९ स्वर्गी, २० सत्-उपाय-उत्तमउपायास, २१ यादव-पति-कृष्णा-जोत्यास.

'मूर्त सदुपाय सकळां पुरुषार्थांचा मुकुंद हा जिकडे,
तिकडे जय;-तुज देतिल मेरूचे पाय-वाट आजि कडे! ४५
'श्री-भूति-जय-नयांतें ज्याची सर्वत्र गुण-कथा पिकवी,
तो हा भगवान् सारथि;-करितां चिंता तुम्ही, तथापि, कवी! ४६
'जा,-स्वस्थ निजा.-प्रातः-काळीं च उद्यां करा जसें कथिलें;
कृष्णाश्रितें करावी चिंता न- जसी रसाश्रितें कथिलें. ४७
'जय-चिंता कां करितो, देवा, कौंतेय, बा, दयालो! हा?
धन्य करिल तव-चरण- स्पर्श-मणि रजोग्रपाद या लोहा. ४८
"नमुनि कुळगुरुसि सानुज, साच्युत, शिबिरासि धर्म ये, राया.
त्या तेशांच्याचि कथा.-ऐशा घडतील काय येरा या? ४९
"प्रातः काळीं होउनि सिद्ध, करुनियां पुढें शिखंडीतें,
धर्म निघे; भीष्माचें रक्षक कुरु-कटक जें, विखंडी तें. ५०
"बहु भाग्य शिखंडीचें,-मौक्याच्याही मदासि जें विरवी!-
कीं, दों पार्श्वीं दोघे,-भीमार्जुन, चक्रपाळ, जेविं रवी. ५१
"करुनि पुढें भीष्मातें, कौरव आले-सशक्र लोकप से;
वीर-रसें क्रूर डोळे भरिति, जळें जेविं तृषित लोक पसे. ५२
"कौरव-भट दंशे, मशक,-विजय धनुर्वल्लि काय ती चवरी!-
हरिस, हरिजनांसहि, लघु- पण वरितां, कीर्ति आयतीच वरी. ५३
"भीष्मा मर्दाया अरि- विट जेविं सतीकुचा- मरायास
झटति. तदायास-जसा गरुडींच रदाकु-चामरा यास. ५४

१विध्वंसी, २बाजूस, ३गांगरिसाका, ४जार,-५तन्-आयास, ६सर्परूप-चवरी वा श्रम.

"भीष्म-हत लक्ष गमले, जेविं लयगलित गतास्त्र रवि,पत्ती.
स्मरली स्त्रांसि तेव्हां अमृतार्थ्यच्युत हतास्त्ररविपत्ती. ५५

"वधिले सारोह अयुत हय,गजहि,तुझ्या महा-कथें बानें;
बहु कडकडे पर-शरें- जैसा अति तैल-पाक थेंबानें. ५६

"विजयें, भीमेंहि, बहुत रिपु मर्दुनि,करूनि भग्न पृतनेला,
भीष्मापुढें शिखंडी, साधुपुढें जेविं हत-स्त्रुत-नेला ५७

"तो तीन बाण हाणी, भीष्म म्हणे,'त्वां यथेष्ट हाणावें;
आम्ही स्त्रीपूर्वावरि शर सोडूंनाच सत्य जाणावें.' ५८

"कोपुनि म्हणे शिखंडी,'यद्यपि तूं क्षत्र घातका रामा
दुर्जय, तथापि मारिन तुज याचक-पारिजातकारामा. ५९

'योद्धा, वक्ता,दाता,-ब्रम्हण्य, शरण्य, अजित तूं हरिसा;
परि सावध हो, मारिन तुजला मी,वृद्ध हरिस युवें हरिसा.६०

'दशशतभुजार्जुनाचें रामें,त्याचें तुवां, तुझें आजी
सर्व यश हराया मी आलों,तुजसीं करावया आजी.' ६१

"भीष्म नव्हे;-तो शक्र, कीं ज्याचे विषयांसि सुख स्त्रव धूती;
न शिखंडी,-आलीसे सेवाया विषय सुख स्त्र-वधू ती. ६२

"पार्थ शिखंडीस म्हणे,'हूं, शांतनवावरि प्रहार करीं;
आहे सिद्ध वराया विजय श्री तुज, धरूनि हार करीं. ६३

'हें धर्म-कार्य सद्यश व्हाया, सत्य-प्रतिज्ञ, साधुनि घे.

---

१ प्रलयकालीं गळालेले, २ गत अस्त्र, ३ पायदळ, ४ अच्युत हत अमृतार्थी-अस्त्रांची विपत्ती, ५ स्वारांसहित, ६ महा आहे कथा ज्याची, ७ बापानें, भीष्मानें, ८ सैन्यास, ९ नष्ट आहे पुण्य ज्याचें, १० याचकांच्या कल्पवृक्षाच्या वना, ११ तरुण, १२ सहस्रार्जुन, १३ युद्ध, १४ सुखांतील सुंदर ध्वनी.

मी वारितों परांला.-सुकृती न कवण गतिज्ञ साधु निघे?६४
"हे ऐकुनि, तो धाया, मत्तोरेण जेविं मृगवरा, टकर,-
कीं, जाय तो कराया निधिपतिसीं द्यूत-पण वराट-कर! ६५
"धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, नकुळ, ससुत जिष्णु, सहदेव,-
हे धांवले नदीजा- वरि, बळिवरि जेविं विष्णु सहदेव. ६६
"वारी धृष्टद्युम्ना कृतवर्मा, सोमदत्ति भीमातें,
नकुळा विकर्ण, कृप सह- देवा; तें होय फार भी मातें. ६७
"जो कांबोज, सुदक्षिण, तो सौभद्रासि यश न दे, वारी;
सात्यकिला दुर्योधन,-जैसा प्लवगेश्वरासि देवारी. ६८
"वारी अश्वत्थामा द्रुपद-विराटाप्रति प्रतापानें;
धर्मासि द्रोण,-जसा वारावा चपळ बाळ बापानें. ६९
"हें बहु किति वर्णावें! अत्यद्भुत एक सांगतों, परिसा;-
विजयाला दुःशासन वारी-शरभा सुदुर्जया हरिसा! ७०
"मोहीं युद्ध सुरांच्या, न तसें सिंधूत्थ तें विष, मना; मी
सम भीष्म, भीम, म्हणतों;-केवळ कविला दिसो विषम नामीं
"मुनि वदले, 'कां ऐसा सोडूनि, म्हणोल इतर वरिन रसा?
सत्य धनंजय कर्में, रूपें; दिसतो उगाचि वरि नरसा.' ७२
"युद्धीं भीष्म म्हणे, 'रे धर्मा, होइल दहांत कुत्सा-हें
भय नधरूनि, वत्सा! मज कथिंनो पायेंचि मार उत्साहें. ७३

---

१ मत्तबोकड, २ कुबेराशीं, ३ कौडी आहे हस्तीं ज्याच्या, ४ वानरपति सुग्रीवास, ५ कुंभकर्ण, ६ समुद्रांतून निघालेलें, ७ पृथ्वी, ८ सांगितलेल्या उपायानें.

'बहु वीर-क्षय घडला, तेणें बहु जीवितासि मन विटलें.—
मेलों रणांत म्हणजे तुमचें,याचें हि,सर्व ऋण फिटलें.' ७४
"यापरि आज्ञा जाणुनि, धृष्टद्युम्नें समस्त कटकांतें
कथिलें* उठा असें जें, मान्य न करितिल यशोर्थि-भट कां तें? ७५
"त्यांसीं करिती गुरु, कृप, नृप भगदत्तादि, नरवरा, जन्य[1];
स्मर-मुनिस[2] रुचों देती निजवीणेचाहि न रव[3] राजन्य. ७६
"भीष्म ग्लहसा,[4] त्याचे, तुमचे ही, द्यूत-कारसे भट ते,—
हरणार्थ, रक्षणार्थ,—त्यजुनि तदितरार्थ, जाहले झटते. ७७
"विजय गमे काळचि कीं, कोणांतहि बळ न तो टिकों दे, हो.
गगनीं प्रलय-घन-घटा,—तैसी तद्दिशिख-कोटि कोंदे, हो. ७८
"मर्मीं बाण शिखंडी हाणी, परि शांतनव गडबडेना.—
जैसा म्हणे विवेकी— बडबडतो दुष्ट,—कां बडबडेना. ७९
'साहे,—जेविं समर्थहि साधु प्रारब्ध कर्म- भोगातें.
सत्व असें नसतें, तरि धन्य म्हणुनि त्यासि कोण, हो, गातें?
"टिकले विजय, शिखंडी, कीं शांतनवापुढें भट-कबंध;
विसकटले विजयपुरो- वर्ति, भुजगपाशसे, कटक-बंध. ८१
"वधिले धनंजयानें,—भीष्में त्याहूनि कटक बहुत रणीं;
दुष्प्रेक्ष्य[5] जसा गमला भीष्म, ग्रीष्मज तसा न बहु तरणी. ८२
"चित्तीं भीष्म म्हणे, 'मी स्वच्छंद-मरण असें गुरुवरानें;

---

१ युद्ध, २ नारदास, ३ ध्वनि, ४ द्यूतपणसा, ५ पहावयास अशक्य.

*. 'कथिलें ध्या भीष्म असें'— असाहि एक पाठ आहे.

अग्निधनेच्छा धरिली परि या श्रीविष्णुनें गुरुवरानें. ८३
'त्यांहि दिला धर्माला वर,बरवा वीर-मानवा सेवं हा;
या समयीं सोडावें वपु, मद्विजयें म्हणो न वासव हा.' ८४
"व्योमीं ऋषि,वसु,वदले,'अस्मदभिप्राय हाचि, शांतनवा.
यावरि समर पुरे; हो शांत;जुना शांत तूं,न शांत नवा.' ८५
'आज्ञा अवश्य'-ऐसें त्यांसि म्हणे भीष्म,मान्य तो करि तें.
कळलें मला मुनिवरें कीं,स्वर्गीचें पडे न तोंक रितें. ८६
"म्हणतां अवश्य,भीष्मा पळ न दिसों पुष्प-वृष्टि दे;वाहे
हिम,मंद,सुगंध पवन; झाली बहु धन्य दृष्टि,देवा, हे. ८७
"जो देणारा विश्वंप- बाल्य विषयवास विप्रतापातें,
होय स्वयेंचि तो,तव तात,विषय वासवि प्रतापातें. ८८
"जिंकावया न शकला, त्रिभुवनजित् तरिहि,मार वीरा ज्या,
गांगेय आपणा त्या विजया करवींच मारवी, राजा. ८९
"पांडव-वीरांत शिरुनि, घे तदिषुदवें स्वतनुस भाजून.-
अकृटनिसाधूंत जसा घेतो अत्र्यात्मजनु सभाजून. ९०
"जाणो गुरुला वाहुनि शर,उजविति साम-धर्म-भीम-कर;
त्यांच्या शस्त्र-समूहीं भीष्म,जसा सागरीं न भी मकर.९१
"लीलेनें युद्ध करी, तन्हि दुर्जय भीष्मत्यांस-शंकरसा.
ज्यासि पतनीं,'अगइ!कसि तरि मी स्पर्शूं'-म्हणे सशंक रसा.

---

१परंतु, २यज्ञ, ३इंद्र, ४स्वर्गी, ५देवगण, ६मला संजयास, ७कामधेनूचें, ८वस, ९जगत्-ब्रम्हांड, १०अर्जुनाच्या प्रतापास, ११मदन, १२दत्तात्रेय, १३पृथ्वी. १४पूजून,

"भीष्म शिखंडि-शरांहीं मर्मीत शिरोनिहीं न कांपविला;
किति ते! हरिजन-वर तो! करिता न शिरोनिहीन कां पविला?
"हांसूनि, पितामहाला ह्मणी दशदा पळांत विजय शतें.
मानी प्रसन्नचित्त त्वत्तात महाप्रताप निज यश तें. ९४
"आपणही शस्त्रास्त्रें योजी-जाणो निरोप दे हातें,-
जों जों कृष्णसख करी व्याकुळ हाणोनि रोप देहातें. ९५
"ज्या ज्यातें सज्य करी छेदी त्यात्याहि अर्जुन-चापातें
द्रोणादिकांसि तेणें बहु होतें दुःख न तनुच्या पातें. ९६
"निःसंशय खंडाया प्रभु सज्य करूनि धनुष्य दे हातें.
हें काय नवल? दाटुनि खंडवि धरिल्या मनुष्य-देहातें. ९७
"सर्वांहि शरीर खिळिलें गिळिलें विजयाशुगें वराजगरें
भ्रमला न प्रभु कांहीं,-पक्षीश्वर जेविं भुजग-राज-गरें. ९८
"गमलें शरीर, शारद- संध्यांशच्छुरित जेविं अभ्र, मला.
भ्रमता सहस्रनयनहि, परि धैर्य-जलधि-नदीज न भ्रमला. ९९
"नित्य नवाचि कथेला दिधला बहु मान साधुनीं ज्याच्या,
विजय, शरांहीं ताडुनि, सुख दे बहु मानसा धुनीज्याच्या. १००
"दुःशासन मात्र जवळि उरला होता, तया तुझ्या तातें
सप्रेम कळविलें, बा, बहु वर्णुनि त्या एथा-सुजोतातें. १०१

१ अधोवदन, शिररहित,-२ सौम्या,-३ अजगरश्रेष्ठानें,-४ गरुड,-५ विषानें,-६ शारद संध्या- अंश- छुरित,- ७ इंद्रहि,- ८ नदीपुत्र- भीष्माच्या,-९ अर्जुनास.

× 'विजयाशुग विसराजगरें.' असाहि एक पाठ आहे. अर्जुनबाण समुदायरूप अजगरानें.

'वत्सा! पहा पहा, रे! विजया शर-निकर काय-हानि कर!
स्त्रीपूर्वे आम्हांवरि- हरि! हरि!-करिजेल काय हा निकर? १०२
'यासि रणीं जिंकाया शक्त नव्हे वज्रधरहि[1] अमरांत;
मातेंहि देव, दानव, राक्षस, करितिल न भग्न समरांत. १०३
'करिति व्याकुळ आम्हां सर्वामरशत्रुफणिशिखंडीचे[2]
कुरु-कुळ-कमळ-तरणिचे पार्थाचे शर, न हे शिखंडीचे. १०४
'न शिखंडीचे,-भेदुनि जातील स्वमेरुच्याहि शिखरा जे,
वज्राग्नि-सम स्पर्शे, व्याळ[3]-सम क्रूर, हे विशिखराजे! १०५
'कर्कटिकेसि[4] तिचे सुत,-खांडिनि मत्तनुसि हे तसे बाण.
प्राण व्याकुळ होते न शिखंडि-शर-व्रजें[5], खरें जाण. १०६
'होउनि एकत्र सकळ राजे, मज विप्र-पद-नता पातें
सर्वास्त्रांच्या देते- कीं, शूळाद्युग्रगद[6], न तापातें.' १०७
"ऐसें वर्णुनि गंगा- नंदन, जन्हि शक्ति राहिली थोडी,
सोडी शक्ति, तिला तीं बाणांहीं अर्जुन त्रिधा तोडी. १०८
"मग, खड्ग, चर्म, घेउनि टाकूं पाहे उडी रथावरुनी;
कीं, टाकावें सत्वर वपु, निज-रण-धर्म-सत्पथा वरुनी. १०९
"अंतःखिन्न[7] धनंजय, शतधा खंडूनि चर्म, करवाल,
प्रभुसि म्हणे, 'गुरुजि, पुढें न कळे कीं काय कर्म करवाल.' ११०
"तों बाहु उभारुनि, निज- सैन्यासि म्हणे त्यजूनि धर्म दया,

---

१ इंद्रहि, २ सर्व-अमर-शत्रु-फणि-शिखंडी-सर्वदेवांचे शत्रुरूप सर्पांविषयीं मयूर, ३ सर्प, ४ खेंकडीस, ५ समूहें, ६ शूल-आदि-उग्र-गद (रोग), ७ अंतःकरण खिन्न ज्याचें ऐसा.

धांवा,मारा भीष्मा,-आम्हां हा धर्म-कीर्ति-शर्म-द,या. १११

"वेढुनि,सर्वास्त्रांहीं हाणिति जरि एकदाचि अरि-सेना,
भीष्म न मानी,जैसा परिस्कनिंहि,दुरुक्ति साधु परिसेना. ११२

"त्या समयीं स्वपरांची गणिली तुमच्या न हानि कटकांहीं;
स्वर्गासि पावले बहु भट,परि न पितामहानि कर कांहीं. ११३

"भीष्मार्थ युद्ध तुंबळ झालें,पूर्वीं सुधारसार्थ कसें.-
असुरांपरि कुरुवीरां गमलें रण-मरण तें असार्थ कसें. ११४

"पार्थ-शर-वर्ष शामवी कुरु-कटकातें-जसें जल दवातें;
बहु उडविले दिगंतीं शर-निकरें गज-जसे जलद वातें ११५

"हाहा! हाहा! ऐसें म्हणतचि हत-शेष-बळ पळालें,हो.
तों विजय-शर-विकळ कुरुवर वपु,रविबिंबसें,गळालें,हो! ११६

"पडतांचि भीष्म,पडले, रडले कुरुवीर,भूप,सुर सगळे;-
जाणों तो परमातुर हस्तींचा अमृतरूप सुरस गळे. ११७

"शरचित देहें जिंकी फळ भीष्म,मनुष्य-देव,पणसाचें;
समयीं सान्निध्य-तसें भेटे तें त्यास देव-पण साचें. ११८

"असुहृदुदासीनांचे भरले,-भरतिल न अन्य काय गळे?
कांपे क्षिति,जेव्हां तो रथ-रत्नावरुनि धन्य-काय गळे. ११९

"भीष्मावरि दिव्य-फुलें देवनिकर,दिव्य-तोय घन,वर्षे;
वदले सुरर्षि,'भो,भो देवव्रत,साधु साधु!अनवर्षे!' १२०

"पक्कार्कबीजसा,न क्षितिस शिवे;वरिच राहिला काय.

१वणव्यास.-२ शरांनीं भरलेल्या, ३असुहृद-उदासीन शत्रूंचे आणि उदासीनांचे,-
४ अनव-ऋषि-हे पुराण मुने.

वाटे इषुंनीं माथा, धीर गुरु म्हणोनि, वाहिला काय! १२१

"पडतां सांजे बहुधा दिनमणिनें शीघ्र रथ न हाकविला;
मरणानुचित समय-हें कळवाया त्वसितामहा कविला. १२२

"तों 'दक्षिणायनीं वपु न त्यागावें बुधें-असें कवण
सांगेल या बुधवरा- प्रति?'-ऐसें होय दिव्य[1]-वाक्-श्रवण. १२३

'उदगयन होय तों वरि मी शर तल्पीं असाचि राहेन,
वाहेन देह शंतनु- वर-सामर्थ्यें, व्यथेसि साहेन.'- १२४

"ऐसें उत्तर देउनि, नेत्रें झांकी जसा स्वपर्यंकीं,-
किंवा, पूर्वीं जैसा गंगेच्या, शिशुपर्णी, उपर्यंकीं १२५

"त्यावरि देव-नदीनें दायादाचे गुणौघ आठविले.
ऋषि, उदगयन-मरण वर-ऐसें सुचवावयासि पाठविले. १२६

"ते हंस-रूप घेउनि, येउनि, करुनि प्रदक्षिणा, प्रणती,
'हा दक्षिणायनीं, कवि होउनि, मरतो कसा?'-असें म्हणती. १२७

"जाणुनि, भीष्म म्हणे, 'या शर-तल्पीं तों करीन मी शयन;-
भय न धरावें; झांकिन नयन तईं, जैं फिरेल हें अयन. १२८

"मज शंतनु-गंगा-गुरु गो-विप्र-वर-प्रसाद-पात्रास
या असमय-भ्रंशें दुर्गति-ऐसा धरूं नका त्रास.' १२९

"इतुकें वदोनि, उपनिष- दर्थ विचारीं स्वरवें शरास्तरणीं.
रडलों आम्ही सर्वहि, होउनि धवलाश्व शरपरास्त रणीं. १३०

---

१ आकाशवाणी, २ चांगल्या पलंगावर, ३ बाळपणीं, ४ मांडीवर, ५ गंगेनें, ६ पुत्राचें,- ७ उत्तम,- ८ शरतल्पीं.

"भीमादि नाचले बहु, जेविं परवधें स्त्रयोध नाचावे;
अस्मच्छोक किति कथूं! शोकव्याळ चि स्वयोधना चावे. ३१
"द्रोणाला, दुःशासन कथितां दे भीष्म-हानि मोहातें;
रडुनि म्हणे,'विजयाच्या, कुरुगुरु तेसाचि, हा[1] निमो हातें. ३२
"अवहार करुनि कौरव, कवचें,शस्त्रें महास्त्रु सोडूनी,
सकळ मिळाले त्वद्गुरु- शर-तल्पाजवळ हात जोडूनी. ३३
"पांडवहि सर्व तेथें आले,राया,तयासि पाहूनी
भीष्म म्हणे,'या हो,या;'-तन्नाम-ग्रहण-पूर्व बाहूनी. ३४
'माझें शिर लोंबतसे, यास्तव उपधान द्या मला तूर्ण;
इतुक्यानें या शयनीं झालें साहित्य,वीर हो,पूर्ण.' ३५
"तें ऐकतांचि राजे उपधानें बहुत शीघ्र आणविती;
'प्रभुजी स्वीकारावीं'_ ऐसें जोडूनि हस्त जाणविती. ३६
"हासे भीष्म,म्हणे,'हो, हीं उपधानें न युक्त या तल्पीं.
कोण्हाही वीराचें मन उपभोगीं नसो अशा[2] अल्पीं.' ३७
"विजयासि म्हणे, बापा! तूं तरि उपधान योग्य दे हातें.
रचुनि दिलें तल्प जसें, वत्सा! हें वीर-भोग्य देहातें.' ३८
"ऐशी आज्ञा करितां त्या शांतनवें,समस्त-योध-नुतें[3],
ठेउनि मस्तक चरणीं, सज्य करी शीघ्र स्त्रज्ञ तो धनुतें. ३९
"अभिमंत्रुनि बाणत्रय गांडीवाच्या गुणासि तो लावी;
सोडी अश्रुसह;नृपा, ती अद्भुत शक्ति काय बोलावी! ४०

१मरो, २उशी, ३ सकलयोध्यांनीं स्तविलेला जो भीष्म त्याणें.

"लागोनि अधोदेशीं, ते घेउनियां सुमंत्रितेषु उशी,
उचलुनि धरिते झाले शिर,- असि दिधली पितामहासि उशी. ४१

"हर्षोनि नदीज म्हणे, 'दिधलें उपधान युक्त, बापा, हें.
तूं या उचित-ज्ञत्वें स्वोत्कर्ष रणीं सदैव, बा, पाहें. १४२

'तुच्छ मजपुढें तो, जो, करुनि स्त्री-बाहुची उशी, रमला.
चुकतां न लागता तुज, पळही, शापावया उशीर मला. १४३

'नृप हो, पहा, कसें हें.- वीरा शयनीं असेंचि ओपावें.-
सांबा! समयीं यासम- समयज्ञाला म्हणोनि 'ओ,'- पावें. १४४

'वपु उत्तरायणींच त्यागिन; तोंवरि असाचि राहीन;
साहेन उष्ण, शीतहि; न तनुकडे, रविकडेचि पाहीन. १४५

'परिखा करवा मोटी या शरतल्पासभोंवती खोल;
लोलें श्वापद मांसीं,- लागो तुमच्या न नीतिला बोल. १४६

'सोडा वैर, नृपति हो; द्या हें मजला,- पुरे करा समर.
किति रे तुम्ही! न पुरला, स्पष्ट जरी छंद-मृत्यु, हा अमर. १४७

"तों वैद्य-राज आले,- शिक्षित-कचसे चि-पोटहि चिराया.-
शल्याकर्षण-सुनिपुण ज्यांचे कर मूर्त चुंबकचि, राया! १४८

"पाहुनि वैद्यांसि म्हणे, 'घडली हे परम सुगति नवसांनीं;
जाळा शरांसह मला.- वैद्यांचें कार्य काय अवसानीं' १४९

"सांगुनि सुयोधनाला, त्यानें धन, मान, देववी, राया.
त्या सत्वें मानवले भूदेव, नृदेव, देव, वीरा या. १५०

---

१सु-मंत्रित-इषु, २खंदक, ३लंपट, ४ इच्छामरणी, ५बाण काढण्यांत, ६मरणसमयीं, -* उसळी -- ** उसें, -

"परिखा करवुनि, सेवक ठेवुनि तद्रक्षणार्थ, पद नमुनी,
स्वस्थाना गेले नृप, - तैसेंचि विरक्ति-केलि-सदन मुनी. १५१
"भगवान् धर्मासि म्हणे, 'नाहींच तुला तव प्रतापा या.
येणें लागेल परहि, लोकालोकाग-वम, तापाया. १५२
"साक्षात्सूर्यचि मानित होते योद्धे रणीं महातेजा,
तो भीष्म भंगला! त्यां, या लोकीं तूंचि, बा, महातेजा! १५३
'छंद-मरण, अति दुर्जय, - अमरांतनसे असी महामरता.
भलत्या तेजें कैसा तेज्याचा निधि असीम हा मरता? १५४
'स्मर:होम श्रीरुद्रें केला; त्वां भीष्म होम हा, देवा.
योग्य सखा तूं अहिता- युर्वारिग्रीष्म, हो, महादेवा. १५५
"धर्म म्हणे, 'जगदीशा, वर्णितिल तुझ्या कवि प्रसादास;
केला धन्य तुवां हा- रुद्रें उपमन्यु विप्रसा-दास. १५६
'पावे तव प्रसादें, स्पष्ट नसोनिहि सुयोध, नर विजया;
तव सेवका न कालहि भयद; मग कसा सुयोधन, रविज, या?
'रक्षिसि तूंचि, अभिलषित पुरवुनि, शरणागता अवनतातें.
या तुजपुढें करावें शक्रसमें ही किती अर्चन तातें? १५८
'देतां महत्व दासा? या. देतो तात काय तो कनका?-
देऊं लागे प्रेमें, तरि म्हणतें त्यासि काय तोक नको? १५९
'होउनि बहु प्रसन्न, प्रभुजी, देतां स्वसेवका महिम्या,

---

१ वैराग्याचें क्रीडास्थान, २ तुळना, ३ लोकालोक- अग- वम- लोकालोक पर्वताचें शिखर, ४ त्यास;- त्याकारणानें; ५ महा- अमरता, ६ अहित- आयु- वारि- ग्रीष्म शत्रूंच्या आयुष्यरूप उदकाविषयीं उष्णकाळ, ७ कर्ण, ८ रक्षण.

महि म्यां न जोडिजेल? स्कीर्तिहि पुरवूनि देवकाम हि म्यां?२।



## अध्याय १२

"प्रातः काळीं कौरव, पांडव, गेले पितामहापाशीं;
दुःखित सर्वहि-जैसे बाळक, पडतां पिता महापाशीं. १
"स्त्री, बाल, वृद्ध, झाले नुति-नति-पूजा-प्रदक्षिणाऽसक्त;-
व्यक्त शिवाचे, जाणों, ते श्रावण-सोमवासरीं भक्त. . २
"लोकांसि मूर्तिमान् शर- तल्पीं गमला तुझा पिता महसा.-
राजर्षि-ब्रम्हर्षि- त्रिदशर्षि-सभांतरीं पितामहसा. ३
"तो 'पानीयं'-ऐसें वदला, राया, नृपासि पाहून;
ते आणविती भक्ष्यें, शीतल जल कलश शीघ्र वाहून. ४
"तें पाहुनि भीष्म म्हणे, 'हा पहिलासाचि काय, हो, गमला?
हा! वेडे हो! हा या समयीं समुचित मनुष्य-भोग मला? ५
'काय तुम्हांसि म्हणावें? इतरा स्फधिता पदार्थ हा चारा.
साचा रामचि समरीं जो तो महूत्स, पार्थ, पाचारा.' ६
"पार्थी विनय प्रभुला, जेविं विनय-भर-विनम्र काय कपी.
तो 'किं करोमि' हें वा- गमृत श्रुति भरुनि भरत-नायक पी. ७

१ स्तुति-नमस्कार-पूजा-प्रदक्षिणांत तत्पर, २ स्पष्ट, ३ उत्साह, ४ ब्रम्हदेव, ५ जल, ६ योग्य ७ विनयाचे भरें वस्त्रकारवांकलें आहे शरीर ज्याचें, ८ वाक्-अमृत, ९ भीष्म. * काय करूं मी.

'शर-जाळ मोडिलें त्वां भेदाया-जेविं पर्वता पविनें;
हें मर्मी चावूंनि, अहि- शतसें, मद्देह सर्व तापवितें. ८

'बहु बाधते तृषा मज, पाजाया तूंचि योग्य तोयातें;—
घन जेविं चातकातें, दावी स्वोदार-भाव तो यातें.' ९

"वंदुनि, तथास्तु म्हणुनि, स्वरथीं बैसूनि, गुणासि शर जोडी;
सोडी घनास्त्र योजुनि, तद्दक्षिण-पार्श्व-भूमि-तळ फोडी. १०

"भू-रंध्रांतूनि निघे सज्जलधारा, जसी सुधाधारा;
वदनीं शिरोनि निववी, हरिलीलासीच, त्या बुधाधारा. ११

"होउनि तृप्त नृपातें भीष्म म्हणे,'काय ती सुधा! राहो.—
पाजी असाचि मजला गंगास्तन आयती सुधारा, हो. १२

'बापा! किरीटि-कर्मे कौरव, ससहाय, कां न कांपावे?
कंठीरव-पाटन-पटु भट यश, मर्दुनि वृकां, न कां पावे?' १३

"बहु विस्मित नृप, मुनि, सुर, म्हणती उडवूनि उत्तरीयानें,
'बुडतिल कौरव! दुसरी कंची भेटेल उत्तरी यानें?' १४

"सर्वत्र शंख-दुंदुभि- घोष परम तुमुल होय सैन्यांत;
तत्काल विगत-गौरव कौरव गेले बुडोनि दैन्यांत. १५

"शांतनव म्हणे,'वत्सा! दाखवितो जेविं नित्य नवल हरी,
तत्सख तसाचि तूं ही;—कीं क्षीराब्धींत नित्य नव लहरी. १६

'त्वत्सारथि नारायण,—तूं नर,—पूर्वर्षि-नारदें कथिलें.

---

१ सर्पशतासारिखे, २ अलास ३ त्याच्या उजवे बाजूचे भूमितळ, ४ सत्-जल-धारा, ५ सिंह मारण्याविषयीं कुशल असा, ६ आंगवस्त्रातें, ७ उत्तम तरी-नौका.

तुमच्या हर्षे धन्यें स्वच्छ-कटकें, जेविं पौरदें कथिलें, १७
'ज्यापरि नाक[1] तुज यशें, न तयापरि मानवे शतक्रतुला[2].
जिंकिल दुग्धाब्धिसमा कैसें अस्मिानवेश तक्रे तुला?१८
'जातींत जसा ब्राम्हण, तेजांत तरणि, सरांत कीं जलधी,-
चाप-धरांत तसा तूं श्रेष्ठ -न जाणे तुला कधीं मल-धी[4].१९
'हित कथिलें भ्यां, विदुरें, द्रोणें, रामें, जनार्दनें,-परि तें
मरणारा औषधसें-रुचलें नाहींच या तुझ्या अरितें.' २०
"दुर्योधनासहि म्हणे, 'या जिष्णुपुढें पुरे करा शास्त्रें;
जाणतसे हा अर्जुन सकळेंहि महाद्भुतें स्फुरे शास्त्रें. २१
'मोठा सर्वांनहि हा,-होय महा-वीर पांडव, न धोरा.
केली निर्माण कसी, ह्मणुनि वसुधेंत कोंड, वन-धारा[7]! २२
'ऐसें अद्भुत, इछुनि सज्जनरक्षाचि, यादवें कृष्णें
हें कर्म करावें,-कीं, या रिपु-कक्षाचिया[8] देवें[9], कृष्णें[10]. २३
'ऐकेल कृष्ण माझें,-कृष्णाचें धर्म,-भीम धर्माचें;-
यांच; करूं दे साम;-भ्रात्यांचें सख्य मूळ शर्माचें[11]. २४
'शेष असा.-वरिली रणा- रंगीं रंगोनि हानि शांतनवें.
अति जीर्ण तसें न,-जसें म्हणवी भंगोनि[12] हो! निशांत[13] नवें. २५
'दे अर्ध-राज्य, सानुज इंद्रप्रस्थीं अजातरिपु राहो.
तुमच्या साम-श्रवणें उत्सव यां[14], आणि त्या हरिपुरा[15] हो. २६

१ पाञ्चानें, २ इंद्रास, ३ नाक, ४ मळीन बुद्धि, ५ लघु, ६ बाण, ७ उदक-धारा, ८ रिपुरूप गवताच्या, ९ वणव्यानें, १० अर्जुनें, ११ कल्याणाचें, १२ हाय, १३ गृह, १४ गजपुरास, १५ द्वारकेस.

'अत्युग्र भीम -काळचि! हें वचन यथार्थ मान, रे;शम, रे.
अमरेश मरेल,नृपा, धर्मक्षोभें; न कां नरेश मरे?' २७
"राहे भीष्म उगा,कीं सोडी नव स्मृत न दुरभिमानातें.
पावे न सूक्ति कुजनीं,-हत-भाग्य-जनींहि सुरभि मानातें. २८
"क्षणभरि उगेचि कौरव, पांडव, ससहाय चित्रसे ठेले.-
केले प्रणाम दूरुनि, मग सर्व स्वस्थाळासि तें गेले. २९
"त्या उपरि किंचिदागत- भय कर्ण हळूचि जवळ ये,राहे.
पाहुनि मनीं म्हणे,'शर कवणा करितिल न कवेळ येरा हे? ३०
"तो शर-तल्पगत प्रभु गमला,गुह शर-वनीं जसा पडला;-
रडला कर्ण महात्मा,-शोकासि कधींच जो न सांपडला. ३१
"कर्ण म्हणे;'अजि देव व्रत! निजलां काय हो विशिख-शयनीं?
तो हा,तुमच्या खुपतो, कण होउनि,सर्व काळ जो नयनीं.' ३२
"नेत्रें उघडुनि,-रक्षक दवडुनि,-एकांत करुनि,-हातातें
कंठीं घालुनि,केला पुत्रादर,लोभ धरुनि हा तातें. ३३
"पुत्रास जसा,प्रेमें अनिमिष चंद्रादिपरिस,बा,पाहे.
एक भुज गळां घालुनि, भीष्म वदे;'बोल परिस,बापा,हे. ३४
'ये ये,मजसीं स्पर्धा- करिता तूं विप्रतीप मोठा कीं?-
आलासि? धन्य होसिल.-म्यां त्यजिला द्वेष,तूंहि तो टाकीं. ३५
'जरि काय मजकडे तूं आजि न येतास,-समय चुकतास,

१ शांत हो, २ इंद्र, ३ सु-उक्ति, ४ कामधेनु, ५ किंचित-आगत-भय- कांहीं सा भयपावून, ६ यास, ७ अन्यास, ८ षडानन. ९ विरुद्धपक्षी.

कर्णा, कल्याणाला, केवळ कविमत असोनि, सुकतास. ३६

'कर्णा, तुला प्रसवली दिनकर-वीर्यें पृथा, न राधा ती.
तरिच कवि विलोकुनि तुज, जैसे नारायणा, नरा,-धौती. ३७

'तूं रविज असें वदला, जो लोकीं मूर्त्त परेमह, व्यास.-
दुर्बोध-तत्व-कथनीं ज्याचा सर्वत्र परम हव्यास. ३८

'वदले असेंचि नारद, केशव, मजसीं रहस्य हे मागें.
केले तरीच कुलजें त्वां प्रमुदित विबुध-जेविं हेमागें. ३९

'न तुझ्या ठाईं माझा द्वेष, खरें हें मनांत आणावें.
वदलों सभेंत निष्ठुर तें तेजोवध-निमित्त जाणावें. ४०

'करितात निमित्तास्तव लोक तिरस्कार जेविं अनयांचा,
करिसि अधिक्षेप तसा, नरसतांहि निमित्त, पांडु-तनयांचा

'संस्कार-धर्म-लोपें दुष्ट जन समागमें उडे शुद्धी;
मग गुणवंताचीही सदधिक्षेपीं प्रवर्त्तती बुद्धी. ४२

'हित-रत-गुरु-मन, पाहुनि गत-सद्वृत्ता गुलास. कळकळतें;
गुरु-कोप भाव्यशिव-परि- हारार्थचि-हें तुला सकळ कळलें.

'धरणीवरि समरीं अरि- जन-दुःसह मज तुझें स्फधनु गावें;
संध्यार्थ ही म्हणति तुज सोडुनि निर्लोभही बुध नुठावें. ४४

'ब्रम्हण्यता-गुणें तुज, कर्णा, श्रीकृष्ण नित्य मानवतो.

---

१ तन होती, २ रविपुत्र, ३ ब्रम्हतेज, ४ उत्साह, ५ गुत्य, ६ निरस्कार, दोषलावणें; ७ सत्- अधिक्षेपीं, ८ गत-सत्-वृत्त-गेलीआहे उत्तमवर्तणूक ज्याचीऐशा, -९ भावि-आशिव-परिहार, होणारें जें अकल्याण त्याच्यानिवारणार्थ, १० शत्रुजनास असह्य ११ न-उठावें. * सुवर्णाद्रीतें,

शौर्यगुणें जिष्णुहि, मग काय इतर मागधादि मानव तो? ४५
वा तूंचि एक दाता!- झाले, होतील अन्य बहु दाते;
परिसुनि तव यश, जोडुनि कर, म्हणतील बुजचि धन्य बहुदा ते
'अस्त्रचर्ळीं, शस्त्रचर्ळीं, संधानीं, लाघवीं, वृषाकपिसा.[1]-
एकांग वीर तूं पर- बलसिंधुविलंघनीं, वृषा, कपिसा! ४७
'काशिपुराप्रति जाउनि, एकें त्वां शस्त्र-वर्ष सोडून,
मोडुन शत्रु,-कन्या- रत्न दिलें कुरुपतीस जोडुन. ४८
'दिग्विजयाची केली सत्या त्वां, वीरकुंजरा! संधा.
आलें गुणें उणेपण रणरंगीं तुजपुढें जरासंधा. ४९
'सर्वमनुष्याधिक तूं तेजोबलराशि, दिविषदर्भकसा;-
होइल तृणांत तृणराम यज्ञ-विहित, तज्ञ गर्हित, दर्भ कसा?
'आम्हीं कोप त्यजिला,-दैव बहु प्रबळ, पुरुषबळ अल्प.-
नाहीं तरि आम्हांला हे ज्ञावे ग्राम काय शर-तल्प? ५१
'मत्प्रिय इछिसि जरि, तरि पार्थांसीं, नमुनि यां अजा, मिळ रे.
करिल दया.-'नारायण-' या नामें तारिला अजामिळ, रे. ५२
'हा कलह भदंन असो,-तूं काव्यमुरवीं न हें कटक टाकीं.
वा! शतकोटि अवीरा म्हणतिल 'वत! हंत! हा! कटकटा!' कीं?'
"कर्ण म्हणे,' सत्य तुझें भाषण हें, भरतनायका, सारें.
त्यां तुज अमृताब्धि-पुढें मिरवावें स्व-यश काय कांसारें? ५४
'जाणें-राधेय नव्हे,- कौंतेयचि मी,-असें असे नातें.

१ हरसा, विष्णुसा; २ हे कर्णा, ३ मारुतीसा, ४ प्रतिज्ञा, ५ दिविषत्-अर्भक-देवपुत्रासारखा, ६ यज्ञास योग्य, ७ ज्ञात्यांनीं स्तुत, ८ तृणविशेष, ९ पुत्रभ्रतारहिता स्त्रिया, १० लहान सरोवरानें.

कुंती-मनीं असावें जें पुत्र-प्रेम, वा, असे ना तें. ५५
'सांगा त्याग उचित कीं, माझा कुंतीस उचित अत्याग?
मज उपजतांचि, मळसा, त्यजिलें.-याहूनि काय अत्याग ५६
'टाकूं कैसी, प्रभुजी, भोगूनियां सर्व थान, राधा मी?
स्थिति होय कृतघ्नत्वें नरकाच्या सर्वथा नरा धामीं. ५७
'भोगुनि ऐश्वर्य, कसें रामर्दी दुर्योधनासि सोडावें?
मोडावें त्यां स्व कृत- ज्ञत्व, कृतघ्नत्व केंविं जोडावें? ५८
'जैसा धनंजयाचा परम-दृढ-व्रत सहाय यदुप-कृती,
तैसा कुरुपतिचा मी,-कीं वहे,-राज्यार्पणादि यदुपकृती. ५९
'दुर्योधनार्य या परि स-धन-तनय-दार सोडिला काय.
आनृण्य न जोडावें, तरि आम्हीं अर्थ जोडिला काय? ६०
'व्हावें शस्त्रेंचि रणीं वीरांचें गलित, न वपु रोगानें.
सकळां मर्त्यजनानें स्मरत्न यावें नित्य नव पुरांगानें ६१
'क्षत्रियशरीर जें जें, पात्र स्मशान्ना,-न आमयातें, हो.
हा पक्क विचार; तुम्ही म्हणतां कां व्यर्थ आम यातें, हो?
'दुर्योधनाश्रयें त्यां कोपविले पार्थ योध; या करितां
हा समरांत मरोंधा क्षत्रिय जन काय बोध या करितां? ६२
'वा, सर्व-क्षत्र-क्षय- सूचक उत्पात बहुत होतात.
सकळ मरोत रणीं स्मृत.-किंवा शोकांत न हुत हो तात? ६४
'अच्युत, पांडव, सकळां मर्त्यांस अजेय,-हेंहि या कळतें.

१अति-आग-महा अपराध, २निपुण, ३अधिक काय ४यन्-उपकृति-ज्याचा उपकार, ५शरीर, ६कर्जापासून मोकळें होणें, ७पुढाऱ्यानें, ८रोगास, ९यज्ञा, १० होमलेले.

परि योग्य-वीर-समर- क्रीडांतरूक-चित्त काय आकळतें? ६५
'जिंकिल च सर्वांस सरवें हा कर्ण, असाध्य पांचवा यास.—
सारथि होऊनि जपतो जगदीश्वर त्यास वांचवायास. ६६
'शक्रासहि प्रतापें मर्दिशूंचा दापिता महानिकर
यांचारि, कीं तदिशूंचा गजवरि, करु, बा पिता महा, नि करं.६७
'वद्दु कटु तुम्हांसि वदला कीं,'गुरदी शांति पर-मनीं चपळ."
प्रभुजी! क्षमा न करितां, तरि हा तुरताचि परम नीच पळ.
'त्वुष्मदनुमोदनानें धरिल मदुत्साह-शक्ति पुष्कलता.
दग्ध-लता अमृत-घनें फळती, न फळेल काय शफलता? ६९
'माझें दुरुक्त तुमच्या चित्तीं नाहींच राहिलें कांहीं.—
परि चुकतां विनवावें ताता करुणा कराहि लेंकांहीं.' ७०
"भीष्म म्हणे,'कर्णा, हे गति हो तुज सर्वकामदा-ज्ञात्या!
आपण अनुसरलों ज्या कर्मा, होइल न कां मदाज्ञा त्या. ७१
'जा.-सद्वृत्त न सोडुनि, युद्ध करीं त्यजुनि गर्व, भय, शोक;
हो कठिन.-प्राप्त तुला होतील क्षत्र-धर्म-जित-लोक. ७२
'प्रशमीं प्रयत्न केला, परि माझेंही न चालिलें कांहीं.
हे काढिली नवी धृत- राष्ट्राच्या हीन चालि लेंकांहीं. ७३
'जा.-परि पळ पाहूं दे वदन-करीं पूर्ण काम हा भागे.
दाक, पुढेंचि धरावी इतुकी त्वां भीड कां महाभागे? ७४
"या भीष्म-प्रभु-वचनें आवरला रविसुतासि न गहिंवर.—

---

१ धर्मकांक्षिता,—२ पळभर.

प्रेमभरचि विकळ करी धीरा, न तरा पडोनि नगोहि वर. ७५
"वंदुनि आज्ञा घेतां, आणी कर्णासि हुंदका नोतें;
सछात्रासि सगुरुचें जैसें लागोनि तुंड कानातें. ७६
"निघतां प्रदक्षिणा त्या परमोदारा करूनि, तो रडला.
राम-घन वनीं त्यजितां जेविं बहु भरत-मयूर ओरडला. ७७
हें भीष्मपर्व पावो साधु-श्रुति शष्कुलीनभा सावें;
श्रीव्यास-कृत मयूरें श्वर विलिखित वेगळें न भासावें. ७८
पुरुषा आर्या वृत्तें जैसी ग्रंथाजया तसी मोटी
शोभा आर्या-वृत्तें आली; भुलतील यासि कवि कोटी. ७९
ग्रंथ प्राकृत दिसतो, परि न प्राकृत विलोकितां नीट; —
गोपांत गोप भासे कृष्ण, परि नयेचि पाहतां वीट. ८०
रसिक कवि, परम सज्जन भगवद्भक्त, प्रसन्न होतील.
न गमेल या परिस हित तो, जो वदनांत अमृत ओतील.
कीं या विजयग्रंथीं हरि-हर-जन-सत्कथा, -दुजी थोडी. —
गोडी अन्य-कथांची नित्य जिला, त्यजुनि गर्व, कर जोडी. ८२
श्रीनारद, वाल्मीक, व्यास, पराशर, वसिष्ट, शुक, -सुकवी
प्रतिभा-रक्षक; -नाशक खळ किति! अमृताब्धिता दव न सुकवी. ८३




१ पर्वतहि २ रडण्याच्यापूर्वी पोटांतून येतो तो ३ संबंध ४ चांगल्याशिष्यास ५ मुख.
६ आत्यकर्णरूप आकाश, - ७ श्रेष्ठा, - ८ आर्याछंदें, - ९ स्फूर्ति.

यत्न न चाले लेशहि म्हणुनि युधिष्ठिर म्हणे शिखंडीतें
वीरा तुवां करावें भीष्मीं नार्गी करी शिखंडी तें ४७

धर्म-महित शिखंडी शल्याऽग्न्यऽस्त्रास वारुणें शमवी
धर्म-ध्वज-धनु खंडुनि देवव्रत देव-दृष्टिला रमवी ४८

मारुति जयद्रथाच्या खगदेनें सर्व घोटका मारी
बहु उग्र गर्मे घेतां गरळाच्या जेविं घोट कामारी ४९



---

१ शल्य- अग्नि- अस्त्रास, २ वरुणास्त्रानें, (पर्जन्यास्त्रानें) ३ मारुत जनु भीम, ४ घोडयांस. ५ काम आरि मदनशत्रू शंकर

| पृष्ठें | पंक्ति. | | |
|---|---|---|---|
| २ | ९ | "या! तूं महा निरंकुश!" | "बा! तूं निरंकुश तुवां" |
| | १७ | देव व्रत हा | हा देवव्रत |
| | १८ | अश्रु, सजवितात | अश्रु, बडवितात |
| ६ | १५ | पाहुनि म्हणति मुनि-मनें | पाहुनि म्हणती मुनिजन |
| ८ | ३ | चालोनि; पुढें युधिष्ठिर, | "चाले पुढें युधिष्ठिर" |
| | ११ | न भजति | "न भजे" |
| ११ | १५ | बोले, "जरि संकोचें | "बोलें जरि संकोचें" |
| १३ | ६ | न बरा असाधु नृप. | न बरा असाधु नृप |
| १९ | ११ | झाला विरथ, परि न तो भ्याला कांहीं तथाहि उर्वरिनें; | झाला विरथ विशस्त्रहि परि न भियाला तथाहि उर्वरिनें" |
| २० | १६ | करि तो भवि तापत्रय वारुनि जनि जेविं कंजनाभाचा | करि तो भवि तापत्रय वारुनि जन जेविं कंजनाभाचा |
| ३७ | १२ | पुरुषार्थ समस्त कल्जजन नामीं | पुरुषार्थ समस्त साधुजन नामीं |
| ४२ | ९ | तो निज गुरु-सुत म्हणुनि, न दे परिभव; दत यासक ळ टाळा. | तो निज गुरु-सुत म्हणउनि दे परिभव-दान यास कवि टाळा |
| ५२ | १ | विजया: मेंद्रा: स्त्रा: स्त्रा | विजया: मेंद्रास्त्रानें |
| ५२ | ५ | जातो मर्मी शिरोनि शर-भाला | जो तो मर्मी शिरोनि शर भाला |
| ६८ | २ | तो द्रोण ही म्हणे कीं | तो द्रोण हा म्हणे कीं |
| ७५ | १० | राज्या-योग्यचि केवळ | राज्या-योग्य न केवळ |
| ९१ | १६ | या तुज-पुढें करावें | बा तुज पुढें करावें |
| ९३ | ११ | बापा! किरीटि-कर्में | बा या किरीटि-कर्में |

१ संसारी, २ आधिभौतिक, आधिदैविक, आणि आध्यात्मिक असे त्रिविध ताप, ३ कल्याण.

## शुद्धिपत्र.

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | २ | परिहितीं | पर-हितीं |
| | ३ | युद्ध पाहावें | युद्ध पहावें |
| | ४ | दृष्टी देतों | दृष्टि देतों |
| | १४ | चिंता शोकें करूनि | चिंता-शोकें-करूनि |
| | १५ | राहूनी | राहूनी |
| | १७ | ५ गुह्य भावांन | ५ परांच्या हिता विषयीं |
| | २० | १७ होणाऱ्या अर्थास | १७ मुनिश्रेष्ठ |
| | | १८ मुनि श्रेष्ठ | १८ होणाऱ्या अर्थास. |
| २ | ७ | असा मान्य | अ-सामान्य |
| | ८ | असामान्य. | असा मान्य |
| | ९ | बा! तुं | बा! तूं |
| | ११ | सर्वस्व-निधान-धन! पाह्या | सर्वस्व-निधान-धनप-ह्या! |
| | १२ | सर्वीहि | सर्वीहि |
| | १४ | तारक.- | तारक |
| | १५ | काकुस्थ | काकुत्स्थ |
| | २१ | १० तारायास समर्थ अज्ञानाता ऱ्यास यासहेतुभून | १० तारणारे |
| ३ | ३ | सोडिली | सोडिली |
| | ६ | पतन कारण | पतन-कारण |
| | | अंध | अघ |
| | १२ | म्हणान होतो | म्हणत होतो |
| | १५ | विवव होम | विश्व होम |
| | १७ | नरणीं | नरणी |
| ४ | १ | विकसे | थिकसें |
| | २ | तुम्हासि | तुम्हांसि |
| | १६ | आम्हा | आम्हां |
| | १६ | महा-कल्क ह्या | महा-खल-ह्या |
| | २१ | ६ महावीर्य | ६ महान् दु[illegible] |
| | २३ | * पशुक्लिन ह्रो | * पशु-क्लिन |

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | ११ | जेंवि | जेंविं |
| | १३ | जोडी | जोडीं |
| ६ | २ | रक्षी | रक्षीं |
| | ५ | कासरनगाशानें | कासरनगाशाने |
| | ८ | मांस | मास |
| | ११ | वदलों | वदल्यें |
| ७ | ३ | सारथी | सारथि |
| | १६ | भीष्मद्रोणादि० भीणारा | भीष्मद्रोणादि० भिणारा |
| | १७ | अविद्यारूपडळ्यापासून चंद्र | अविद्यारूपपडळ ज्यापासून सूर्य |
| | | पक्षी | पक्षी |
| | १९ | चंद्रासारिखा | सूर्यासारिखा |
| ८ | ९ | पाहातां | पहातां |
| | २२ | ‡ अहोबंधू | ‡ बंधूसह |
| ९ | ५ | घा: देइल | घा; देइल |
| | १७ | कायकरू १ सांगवत्सवरदा या- | कायकरूं मांग, वत्स-वरदा १ या, |
| १० | १३ | इत्याद्याशी- सहस्र | इत्याद्याशी; सहस्र |
| | २३ | १५ मान्य होवो | १५ वश होवो |
| ११ | २१ | ६ मदनासारख्यापुरुषास | ६ ज्यासकामफारअज्ञानगास |
| १२ | ६ | आम्हास | आम्हांस |
| | १२ | असि- प्रति | अशि- प्रति |
| | १३ | असि प्रतिज्ञा | अशि प्रतिज्ञा |
| | १४ | आम्हाला | आम्हांला |
| १३ | २ | नामें | नामें |
| | १० | बंधु | बंधु |
| | १८ | भुजांनें | भुजांनें |
| | १९ | ३ जन्मरहिता | ३ जन्मरहिता- कृष्णास |
| १४ | ८ | मद अंब स्थापिना | मद लंब- स्थापिना |
| | ९ | न दिसी देवि | न दिसीं देवि |
| | ११ | यत्न शानेंही | यत्न- शांतेंही |
| | २० | + ठेवणारा | + लवहि |
| १५ | ९ | राज्याजी | राजाजी ( हे धृतराष्ट्रा ) |

| पृष्ठं | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५ | १० | निंदाव्या | निंदावें |
| | १६ | वदेले रुरार्षि | वदले रुरार्षि |
| | २० | ५ राज्यांच्या युद्धास | ५ राजांच्या युद्धास |
| १६ | २१ | त्यासहि | त्यांसहि |
| १७ | १७ | पुष्ट-प्रद | पुष्टि-प्रद |
| | २२ | १८ पाठदेणारे | १८ साह्यकरणारे |
| १८ | १४ | समस्तभानु | सहस्र-भानु |
| | १८ | श्री शौरि-शरीरीं | श्री-शौरि-शरीरीं |
| | | हाणी | हाणी |
| | २२ | ८ पुनः पुन्ह | ८ पुनः पुन्हा |
| २० | २-३ | कालिंगमथन ह्या आर्येचा आंकडा ३८सावा आहे | कालिंगमथन ही आर्या ३९सावी |
| | ४-५ | शिरतांकलिंग- ही आर्या ३९वी | शिरतांकलिंग ही आर्या ३८सावी |
| | ९ | आम्ही | आम्हीं |
| २१ | ६ | सांगो | सांगों |
| २२ | ५ | वाजिति | वाजति |
| | ८ | ते | कीं |
| | ९ | बाहुटळ | वाहुटळ |
| | ११ | कौरव-पांडवा-ह बाहून | कौरव-पांडवा-ह वाहून |
| | २० | ३ शरीरनाशकरणारी | ३ शरीरनाशकरणारे |
| | २३ | * कलयुगांत कलहांत | * कलियुगांत, कलहांत |
| २३ | १४ | युक्त | युक्तः |
| | ११ | रुधा पिनां | रुधा १ पिना (रुधा आपिना-शापिता) |
| | १६ | पृथुल-जल-जलद- | पृथुल-जलज-दल- |
| | २० | + फारआहेउदक ज्यांत-इ० | + मोठ्या कमलदलाप्रमाणें सुंदरनयनें ज्यांची अशा |
| २४ | १ | स्व-गुरु-वचें | स्वगुरु-वच |
| | ४ | आम्ही | आम्हीं |
| २५ | १७ | हरिसन | नहरिस |
| २६ | १७ | उणे | उणें |
| २६ | १३ | धरितो | धरितों |

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २६ | ११ | वधीन खल | वधीन मी खल |
| २७ | ७ | कांपविलें | कांपविले |
| २८ | ६ | मूर्ध स्पर्शीच | मूर्ध- स्पर्शीच |
| | १८ | या | त्या- |
| | १९ | १ धनरूपशरीर | १ धन आणि शरीर |
| २९ | १३ | परिहरितों | परिहरिता |
| | २१ | ४ शस्त्रांहीभेदलेली | ४ शस्त्रांहीभेदलेली |
| ३१ | १३ | होतें | होते |
| | ११ | धृत-पुत्र-नाश। कोपाया | धृत-पुत्र-नाश कोपा। या |
| | २१ | ५ हेपुत्रनाशधारणकरणान्या | ५ हेपुत्रनाशकोपधारणकरणान्या |
| | २२ | ७ ऋषि प्रणित | ७ वाल्मीकिप्रणीत |
| ३२ | ८ | भीष्म- क्षयार्थ | भीम- क्षयार्थ |
| | १२ | तों | तों |
| ३३ | २ | मगजे | गमजे- या आर्येचा अंक ३०अ सतां २पडला यामुळे अध्याया चे शेवटीं २६वा अंक आहे पण तो पूर्वीपासून अनुक्रमानें ६२वा येतो |
| ३४ | १४ | पीडित | पीडित |
| ३५ | ४ | तूंचि | तूंचि |
| ३६ | २६ | ऐसें विदुरमत जसें | ऐसें विदुरहिमानें |
| | १३ | संगतिही | संगतिही |
| ३७ | ११ | पावलों त्या | पावलों ज्या |
| ३८ | १८ | ३ दानवासहित | ३ दानवांसहित |
| | २१ | * देवाच गुह्यरत्नांत | * देवांचागुह्यरत्नांत |
| ३९ | [illegible] | केलेंहि भट | केलें हिभट |
| ४१ | ५ | शौर्य-दान | शौर्य- दान |
| ४२ | ७ | सम तिघें | सभ ति घे |
| ४३ | ९ | शत्रु-वश | शत्रु वश |
| | १० | युद्ध अतुल | अतुल युद्ध |
| | ११ | विधि-भवांत | विधि- भवांत |

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४३ | १५ | तोरव, | तोरव |
| ४६ | ८ | व्यसन-धन | व्यसनि धन |
| | ११ | द्रुपदासि | द्रुपदादि |
| | १८ | ते यासि म्हणनि, दावाग्नशा सम, हो, यान; हरिसमा चोर | ते त्यांसि म्हणाति; दावाग्निशास म हो या न हरि-समा चोरे |
| | १९ | ६ पांडवरूप वृक्षाविषयीं-इत्या० | ६ पांडवरूपपर्वताविषयीं-इत्या० |
| | २२ | १२ हर | १२ चेष्टा |
| ४८ | ६ | वाकुनि | वाकुनि |
| ४९ | १६ | अतर-रिपु | अंतर-रिपु (आंतर रिपु |
| ५० | ६ | लावू | लावूं |
| | १७ | त्याचीति | त्याचीं ती |
| ५१ | १३ | जेवि | जेविं |
| ५६ | ५ | हा कोप | हो कोप |
| ५८ | ५ | आत्मा | आम्हा |
| | | हासाजिरा | हा साजिरा |
| | ६ | एसैसिद्ध | ऐसेसिद्ध |
| ५९ | ५ | परांशर | पराशर |
| | १३ | राक्षसी तनय माया | राक्षसी तनय माया |
| ६१ | १ | भ्यालों | भ्याला |
| | ९ | क्षत्र-वृत्ति! ने मज | क्षत्र-वृत्तिनें! मज |
| ६४ | १३ | देहूं | देहें |
| | १८ | तो परम | परम तो |
| | २१ | ५ गंधर्वांनीं बांधलेल्या ऐशा | ५ गंधर्वांनीं बांधलेल्याऐशा |
| | | ६ शेवटलेल्यामुलाचें | ६ शेवटल्यामुलाचें |
| ७० | ७ | घटिकार्थ | घटिकार्ध |
| | १८ | हें हीफार | हेंही फार |
| ७२ | २ | न्हाले ते | न्हालें तें |
| | | दिसले | दिसलें |
| | ३ | झाले | झालें |
| | ३ | अनादि सले | अनादि सलें |
| | ९ | हा शूर दूर ओ सर | हा शूर—दूर ओसर |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७२ | १ | महा- प्रभा- वहा. | महा- प्रभाव- हा |
| " | २० | ३ महाप्रभावाहूणाऱ्या | ३ मोठाप्रभावज्याचा |
| ७३ | ६ | पांड- | पाड- |
| " | १७ | मीं | मी |
| ७४ | ७ | वायुयोग | वायुवेग |
| ७६ | ११ | साद्य साधु | साधु साद्य |
| " | १६ | पिता महा सरणीं | पितामहास रणीं |
| " | २८ | ६ आज्ञा धारक | ५ तुझ्या आधीन राहणारी |
| ७९ | २२ | १५ स- अशग- | १५ स-आशग- |
| ८१ | ५ | मर्द्दुनि | मर्दुनि |
| ८३ | ७ | याचे | त्यांचे. |
| " | १७ | "वधिले | "वधिलें |
| ८७ | २१ | ३ अस हृद- उदासीन शत्रूंचें आणि उदासीनाचें | ३ अस हृन- उदासीन शत्रुचें आणिउदासीनांचें |
| " | २२ | ४ हे पुराण मुने | ४ हे पुराण मुनें |
| ८९ | १८ | विचारीं | विचारी |
| " | ३१ | आम्ही सर्वहि | आम्हीं सर्वहि |
| " | ३१ | ६ पुत्राचें | ६ पुत्राचे |
| ९१ | ५ | महातेजा | महाते ज्या |
| | ६ | त्यो | त्वां |
| | ९ | म्हणतं | म्हणतें |
| | २२ | ४ त्यास | ४ तू |
| ९२ | ९ | नृपासि | नृपासि |
| ९३ | ४ | दावी | दावीं |
| " | २० | सर्पज्ञाना मारिवे | सर्पज्ञाना मारिवें |
| | ६ | स्वस्थाळासि | स्वस्थळासि |
| ९६ | ९ | निमत्त. | निमित्त |
| ९८ | १३ | मर्त्यजनानें | मर्त्यजनातें |
| १०० | २० | २उठण्याच्यापूर्वींपोटां. इत्यादि. | २ उठण्याच्यापूर्वीं. इत्यादि |